# प्रीतीची हांक

( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )

लेखिका

वसुंधरा पटवर्धन



# १

इतके दिवस तापान अंग फणफणून येत होतं. पण आता ताप उतरला होता. अशक्तपणामुळे डोळ्यावर गुंगीची झापड येत होती पण दिवसभर गुंगीत पडून राहिल्यामुळेंच की काय प्रभाकरपंताना आता रात्री झोप येत नव्हती. खोलींत दिव्याचा अंधुक प्रकाश पडला होता. कोपऱ्यांतल्या खिडकीतून रस्त्यावरच्या दिव्याचे खांब दिसत होते कोणा वाटसरूना वाट दाखविण्यासाठीं ते उभे होते. पण रात्रींचे अकरा वाजले होते. आणि रस्त्यावरून कोणी कोणीसुद्धा जात नव्हते. दिवसभर चालणारी रहदारी आतां अगदीं झोपीं गेली होती आणि ते रस्त्यावरचे दिवे बिचारे एकाकी उभे होते प्रभाकरपंतानी निजल्या निजल्या दूरवर नजर टाकली. रस्त्यावरचीं घरं शांत होतीं. आणि झाडसुद्धा विशेष डोलत नव्हतीं. वारासुद्धा झोपेला आला होता. एकटे जागे कायते प्रभाकरपंत. बाकी साऱ्याच्या क्रिया यावेळीं अगदीं थांबून गेल्या होत्या.

प्रभाकरपंतानीं आपल्या खोलींत नजर टाकली जवळच्या टेबलावर तस्त होतं, तांब्याभांडं होतं. औषधाच्या बाटल्या होत्या. आणि बाहेरच्या लुकलुकणाऱ्या दिव्याचा अंधुक उजेड त्यावर पडला होता. त्याच्या पलंगाशेजारच्या आरामखुर्चीवर त्याची पत्नी झोपीं गेली होती. तिचा चेहरा किती दमलेला दिसत होता काळजीनं आणि शुश्रुषेन ती सुकून गेली होती. प्रभाकरपंताना तिच्याकडे पाहून, आपल्या भोवतालच्या वस्तूकडे पाहून वाटलं आपणच नुसते आजारी नाहीं, आपली ही खोली, इथल्या वस्तु, आपली दमून झोपीं गेलेली पत्नी, आपण सारेच आजारी आहोत.

त्यांना अगदीं कंटाळा आला होता. गेले पंचवीस दिवस तरी ते या अंथरुणावर निजून होते. इतके दिवस तापाच्या गुंगींत गेले. आतां ताप गेला आणि तेव्हांपासून प्रभाकरपंतांना सुचेनासं झालं होतं. कसला विचार करू नये असं तर त्यांना वाटत होतंच. पण यापूर्वी आपण विचार

करीत होतों, आपल्याला विचार करता येत होता या गोष्टीचच त्याना आतां नवल वाटू लागल. भेटायला येणाऱ्या माणसाशीं बोलण्याची त्याना इच्छा नव्हती. आणि स्वतःची स्वतःच करमणूक करून घेण्याचहि साधन नव्हत. माणस आलीं तर त्याना नकोशीं वाटत होतीं, आणि गेलीं तर आपण एकटेच या विचारान त्याना रानात पडल्यासारख वाटत होत. आपण काय कराव हें त्याना सुचत नव्हत. पण काही करू नये असच, अगदीं असच पडून रहाव असहि त्याना वाटत होत. वेळाची गति जणु थाबूनच गेली होती इतके दिवस वेळ सारखा चालला होता. सपाट्यान धावत होता. आवढा गिळायला, किंवा मागल्या वेळात काय काय घटना घडल्या याचा विचार करायला जणु त्याला सवडच नव्हती. मागे वाघ लागल्यासारखा तो पळत होता. सेकद, मिनिट, तास, घटका, महिने, दिवस आणि तीं खडोगणती वर्षं, या साऱ्याच लेंढार घेऊन काळ बिचारा नुसता धावत होता. आजारी पडण्यापूर्वीं प्रभाकरपत मनाशीं म्हणाले होते, हा सारखा सोसाट्याच्या वाऱ्यासारखा चाललाय तरी कुठे ? आणि बिचारा आला तरी कुठल्या देशातून ? मला हे चोवीस तास पुरत नाहींत. दिवसाचे अठ्ठावीस तास होतील तर ? निदान सत्तावीस ? पण छे ! थाबून एखाद्या क्षणाचीहि दया करायला तो तयार नव्हता त्याच आपल जाण्याच काम चालूच होत काळ जात होता आणि आपण म्हणत होतों कीं नवा काळ येतो आहे.

पण आज ? आज प्रभाकरपताचा वेळ जाता जात नव्हता. आज त्याना वेळ जायला हवा होता तर तो एखाद्या अडेलतट्टासारखा थाबून राहिला होता. त्यानं थांबाव अस प्रभाकरपताना वाटत होत तेव्हा तो एखाद्या बेदरकार माणसासारखा चालता होत होता. म्हणजे नको होत तेंच अगदीं नेमकं घडत होत. प्रभाकरपत स्वतःशींच हसले. पण त्याना त्या हंसण्याचंसुद्धा सुख वाटलं नाहीं. अस वाटल कीं आपण उगीचच हंसलों. क्विनाईन घेतल्यासारखा त्यानीं चेहरा कडवट केला. आणि त्यांच्या ध्यानात आल कीं आपल शरीर जस थकल आहे तसच मनहि थकलं आहे. त्यानीं कूस पालटण्याचा प्रयत्न केला. मोठ्या कष्टानं ते

डाव्या बाजूकडून उजव्या कुशीवर वळले पण त्याचासुद्धा त्याना त्रास झाला. मनात अस आल कीं आपल शरीर म्हणजे दहा वीस मणाच ओझं झाल आहे एखाद्या जड वाळूच्या पोत्यासारख तें हालता हालत नाहीं. पण हाताचा तो फिकटलेपणा, त्याचीं तीं नुसतीच लांब, काडीसारखीं किडकिडीत झालेलीं बोट पहाताच असहि वाटल कीं आपण एखाद्या वाळलेल्या पानासारखे हलके झालो आहोंत. फुकर मारली तर या देहाचं हे पान हेलपाटत, हेलपाटत कुठच्या कुठे जाईल.

पण हा कसला विचार ? माणस आजारी पडलीं म्हणजे काय त्यांच्यात जमीनअस्मानाचा फरक पडतो ? आपण लहानपणीं शेर शेर दूध प्यायलो. घामाचा पुतळा उठेपर्यंत जोरबैठका काढल्या. मनाची रग जिरेपर्यंत कुस्ती मारली. जेवायला बसल्यावर आठ आठ दहा दहा पोळ्या हाणल्या. लोण्याचे गोळे आणि तुपाची तामली रोजच्या रोज पोटात रिचवली. या सान्या खुराकाच आज झाल तरी काय ? आपल मनगट बघूनच आपल्या बरोबरचे लोक थप्पड बसल्यासारखे गालावर हात चोळीत चोळीत रस्ता सुधारीत असत. तीन शेर उसाच्या रसाची चरवी म्हणजे फुलपात्रभर पाणी वाटत होत आपल्याला. एवढा ताकदवान बांधेसूद देह पण फुलासारखा हलका वाटत होता. समोरच्या काडी पैलवानाला आपण मनांतल्या मनात हसत होतों. आणि तो हा देह वीस दिवसाच्या तापांत एवढा जमीनदोस्त झाला ! कुस्तींत पहिल्या नंबरचीं बक्षीस पटकावणारी ही मूर्ति ओरबाडलेल्या गवतासारखी कशी झाली ? ज्यान धांवण्याची शर्यत जिंकून गळ्यात हार घालून घेतला तो आज पाय मोडल्यासारखा अथरुणावर पडून राहिला ? या देहात आतां शक्ति नाहीं. या देहात त्राण राहिल नाहीं. मग तो व्यायाम आणि तो पौष्टिक खुराक या सान्याचं झालं तरी काय ?

छे ! काहीं तरीच. अस म्हणून प्रभाकरपतानीं आपला हात जोरानं आपटायला म्हणून वर उचलला आणि आपटण्यापूर्वीच तो आपोआप खालीं पडला. आपण किती अशक्त झालो आहोंत याच त्यांना पुन्हां प्रत्यतर आल. त्याचे डोळे किंचित् ओलसर झाले. आणि अस वाटलं

कीं देहापेक्षां आपलं मनच नाजुक, हलक, हलक झालं आहे. त्याला कसला विचार करता येत नाहीं. आणि कशान कोण जाणें ! कदाचित् एकाच कुशीवर निजून प्रभाकरपंतांच्या डोक्याला मुंग्या आल्या. तें जड बधिर झाल्यासारख त्यांना वाटल. आणि त्या क्लेशामुळेच कीं काय शरीर भारी जड, जड झाल्यासारख वाटल.

यामुळें आपल्याला धड विचारसुद्धा करता येत नाहीं ही तक्रार ते आपल्या मनाशीं करीतच राहिले. अमक्याच विषयावर आपल्याला विचार करायचा आहे अस त्याच ठरलेल नव्हत. पण आपण दुसर काहींच करू शकत नाहीं तर निदान भरघोस विचार तरी करावेत आणि मनाची करमणूक करून घ्यावी अस त्याना वाटत होत. पण विचार तरी कसला करायचा ? ते काहीं कलावन्त नव्हते, साहित्यिक नव्हते. सिनेमांत नाटकात काम करून कधीं चमकले नव्हते. पेटी, तबला, तंबोरा याच्याशीं त्यांची जवळून ओळख नव्हती लहानपणीं काय तो थोडा व्यायामाचा शोक त्यानीं केला होता. पण मोठेपणीं तो सुटला. नाहींतर जन्मभर काय जोरबैठकाच काढायच्या होत्या ? गायन, चित्रकला, नाटय, नृत्य, साहित्य या कलांच्या एकदां का माणूस तावडीत सापडला कीं तो त्या कलेचा मग जन्मभर गुलाम होतो. त्या कलेच्या मगरमिठींतून त्याची मग जन्मभर सुटका नाहीं. व्यायाम ही कला मात्र अशी फसवी नाहीं. तेच बर आहे. नाहींतर हल्लीं गल्लोगल्लीं गवई आरडाओरडा करीत असतात. आणि मग लोकावर सकट ओढवत. त्यापेक्षां आमची ही कला तरी अशी गळेपडू नाहीं. ती जर अशी गळेपडू असती तर जोर, बैठका, तीं वजन, त्या जोडया, ते मल्लखाब आणि त्या कुस्त्या ! सकाळ सध्याकाळचा सगळा वेळ मग फुकट त्या आखाडयात घुमण्यात गेला असता. चुकला फकीर मशीदींत तसे प्रभाकरपत तालीमखान्यात सांपडले असते. आणि संसाराचा मग आखाडा झाला असता.

पण तसं कांहीं झालच नाहीं. म्हणजे व्हायचंच नव्हतं. प्रभाकरपंत इतर चारजणासारखेच शिकले. पण बी. ए. न होतां बी. ई झाले आणि

कंत्राटाचीं काम घेऊ लागले. लगेच त्यांनीं एका मुलीशीं लग्न केलं आणि आजतागायत तिच्याशीं सुखानं संसार केला.

प्रभाकरपंत म्हणाले, "पण यांत आश्चर्य कसलं आलं आहे ? जगातले निदान हिंदुस्थानातले, किमानपक्षीं संयुक्त महाराष्ट्रातले शेकडा नव्याण्णव टक्के लोक तरी हेंच आयुष्य घालवीत आहेत. त्यांत नाविन्य कसलं ? इतरानीं केलं तेंच मी केलं. बायको, मुलं आणि आपल्या कंत्राटाचीं काम यांचं जे वर्तुळ आज पंधरा वर्षं फिरत आहे त्यातच मीहि फिरत आहे. गिरक्या घेतों आहे. त्या गिरक्यानीं कधीं भोवळ आली नाहीं, कीं कधीं त्या वर्तुळाची मर्यादा ओलांडून जगांत काय चाललं आहे याची फाजील चौकशीसुद्धा आपण केली नाहीं. मग विचार कसला करायचा ? आपल्या धंद्याचा ? तो तर आज पंधरा वर्षं केला. अगदीं सुरवात करण्याच्या आधींपासून तों परवा पंचवीस दिवसापूर्वीं अंगात ताप भरेपर्यंत. आता आज आणखी मन इतकं हळूवार झालेलं असताना पुन्हा तोच विचार करायचा ? त्या दगडामातींत कसलं काव्य आहे ? किंवा मनाला विरंगुळा वाटण्यासारखं तरी त्यात काय आहे ?

प्रभाकरपंताचं घोडं पुन्हा अडून बसलं. आपल्याला विचार करतां येत नाहीं या प्रश्नाचा गुंतवळा घेऊन ते पुन्हा धागा शोधू लागले. आपल्याला आज विचार म्हणून करता येत नाहीं असं म्हणता म्हणताच त्यांनीं आपल्या आयुष्यावर ओझरता दृष्टिक्षेप टाकायला सुरवात केली होती पण त्यातून काहीं नेमकं सार बाहेर पडेना. लहान मुलानं वेडे-वाकडे कापलेले कपटे एकत्र करून त्याचं चित्र करण्याचा प्रयत्न करावा आणि त्याचा साधा पतंगसुद्धा होऊं नये अशी प्रभाकरपंताची अवस्था झाली होती. मनातल्या मनात ते अगदीं कातावून गेले. पण वरकरणीं ते अगदीं शान्त होते. डोळे मिटून ते पडले होते. त्यांची पत्नी त्यांना काय हवं नको तें पहाण्यासाठीं जवळच इझिचेअरवर पेंगत बसली होती. बिचारी गेले वीस दिवस नवऱ्याच्या शुश्रुषेंत रात्रंदिवस झटत होती, आज तापाचं प्रमाण खालीं उतरतांच तिचा जीव जरा स्थिरावला होता. आणि ताप उतरल्यामुळें देहधर्म म्हणून तिला आज झोप लागली होती. तरी

पण दोन चार वेळा तिनं डोळे किलकिले करून पाहिलं. पांघरुणाची सुरकुती सारखी केली, आणि हातात घेतलेलं पुस्तक छातीवर धरून ती पुन्हा डोळे मिटून पडली

इकडे प्रभाकरपंत मात्र स्वस्थ पडलेले असले तरी कोणताहि विचार सुसंगत सुचत नाहीं या विचारानच ते अस्वस्थ झाले होते आजच्या सामाजिक राजकीय परिस्थितीचा कानोसा घेण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण ज्या विषयाच्या वाटेला ते आजपर्यंत कधींच गेले नव्हते त्या विषयावर आपलीं मत काय आहेत हे त्याच त्याना तरी कधीं कळाव ? आर्थिक परिस्थितीचा विचार फक्त त्याना त्याच्या धंद्यापुरताच करण्याची सवय होती. जगात रुपयाची किंमत वाढली आहे कीं कमी झाली आहे असला रुक्ष, नीरस काथ्याकूट त्यानी आयुष्याच्या चाळीस वर्षात कधीं केला नव्हता. मग आजच प्रकृति बरी नसताना, आणि डोळ्याला डोळा लागत नसताना ही माथेफोड कशाला ?

मग प्रभाकरपंतानीं विचार केला कीं मनोराज्य करायच. समजा, आपण उद्या लॉटरीच, एक रुपयाच तिकीट घेतल आणि आपल्या नशिबान त्याचे दहा लाख रुपये आपल्या हातात आले तर त्याच आपण काय करू ? प्रथम आपण लाख रुपयाचा सुदर बगला बाधू. गेले लाख रुपये ! दहा हजाराची कोरी गाडी घेऊ. बायकोला लाख रुपयाचे दागिने करू. आपल्याला दोन मुलगे आहेत. त्या प्रत्येकाच्या नांवान निदान दोन लाख तरी बॅंकेत ठेऊ. दोन मुली आहेत. त्या दोघींना मिळून लाख रुपये हवेत. उरले तीन लाख. म्हणजे बहुतेक सगळे सपलेच कीं. त्यांतला एक रुपया पुन्हां लॉटरीचं तिकीट काढायला बाजूला ठेवायचा. दहा वीस हजार दानधर्म. एखाददुसरा लाख बॅंकेंत. तरी विम्याचे हप्ते, मुलाना विलायतला पाठवायचा खर्च आणि शिवाय म्हातारपणची सोय. म्हणजे दहा लाखानीं काय कात होणार हो ! पैसा हातांत नाहीं तंवरच वाटतं माणसाला. पैशाची हीच गमत आहे. तो हातांत येण्यापूर्वीच काय तो हातांत आल्यासारखा वाटतो. पण एकदां का तो हातात आला कीं मग तो कधीं जवळ रहायचा नाहीं. त्याला सतराशें फाटे फुटतात. येताना तो जड पावलांनी

येतो. आणि जाताना मात्र चोरपावलानीं पसार होतो. आतांच पहा ना. दहा लाख जवळ होते पण केव्हाच त्यांचा खुर्दा झाला पैसाच संपला. मग पैशाचा विचार कसला करायचा ?

प्रभाकरपंत एखाद्या खोडकर मुलासारखे पुन्हा त्या विचारापाशीं अडून बसले. एखाद्या वेळीं माणसाला सुसंगत विचार सुचत नाहींत म्हणजे काहीं इलाज चालत नाहीं. त्यातून प्रभाकरपंत आजारी त्यानीं फक्त एकदा किलकिल्या डोळ्यानी बघितलं. त्याच्या बायकोला अगदीं शांत झोप लागली होती. भोंवतालच्या शांत वातावरणात कसलाहि फरक पडला नव्हता. तोच अंधुक प्रकाश आणि तेंच आजारी वातावरण. प्रभाकरपंतानी पुन्हा कूस बदलली आणि त्याबरोबरच त्याची दिशाहि बदलून गेली.

आता त्यानी ज्या बाजूला तोंड केलं होतं त्या बाजूला त्यांच्या आईचा आणि वडिलाचा फोटो टांगलेला होता. त्यांना आता हा लोक सोडून दहा वर्षं झालीं होतीं. इतकी जुनी गोष्ट. पण त्याना आज आपल्या आई-वडिलाचा अभाव तीव्रतेनं जाणवत होता. प्रभाकरपंत मताचे कणखर, वृत्तीचे बेदरकार. उभ्या आयुष्यात त्याना काळजी कशी ती माहीत नव्हती. आई वडील महिन्याच्याच अंतरानं गेले. पण समाचाराला आलेल्या लोकाचं त्यानींच सांत्वन केलं. त्यानी सांगितलं " असं पहा, ते गेले. आता काहीं ते परत यायचे नाहींत. जवळ जवळ जायची वेळ झालीच होती, पण थोडे आधीं गेले. काय वाईट झालं ! नाहीं तरी वडिलांच्या मागे राहून आईनं चोवीस तास अश्रू ढाळायचे आणि आम्ही तिचे डोळे पुसायचे. त्यापेक्षां झालं ते सोन्याहून पिवळं झालं. "

प्रभाकरपंतांच्या मनाच्या तटबंदी प्रसंगांतसुद्धां अशा भक्कम होत्या. कारण घडलं, प्रसंग अंगावर येऊन आदळला तरी धैर्याच्या या भिंती कोसळून पडल्या नाहींत. पण आज कारण नव्हतं तरीसुद्धां त्यांच्या त्या बेदरकार वृत्तीचे पापुद्रे फुलून वर आले. प्रभाकरपंत आजारी होते. रात्रींची वेळ होती. मनाला कांही सुचत नव्हतं व देह अगदीं दुबळा होऊन अंथरुणावर पडला होता. यावेळीं तें इतकीं वर्षं आंतल्या आंत

राहिलेल पाणी डोळ्याच्या कोपऱ्यातून थबकत ठिबकू लागल. फार काही वाटलं नाहीं. आई वडिलाच्या फार आठवणी डोळ्यासमोर आल्या नाहींत. पण एवढच वाटल कीं आई असती तर तिन कपाळावरून हात फिरवला असता. पाघरूण सारख केल असत आणि बाबानीं दहा वेळा विचारल असतं " औषध दिलस का ग त्याला ? "

एवढच ! फक्त एवढा एकच विचार. पण प्रभाकरपत विरघळून गेले. आई वडिलाचा आणखी विचार त्यानी केला नाहीं. माणूस नाहीं तरी स्वत.सार्टीच बहुधा अश्रु गाळतो. एखादा माणूस अकालीं गेला तर त्याच काहीं वाईट झाल यापेक्षाहि तो आपल्याला अतरला याचंच माण-साला खरं दुःख होत असत. स्वार्थाला धक्का बसला कीं माणसाच्या अतःकरणाला वेदना होतात प्रभाकरपंताच तेच झाल. पण तें क्षणिक होत. आणि आत्ता, या समयीं त्याना जुन्या दुःखाच्या आठवणी उकरून काढून अश्रु गाळीत थकून जाण्याची मुळींच इच्छा नव्हती. त्याच्या मनाला एखाद्या विषयावर सुसगत विचाराचं खाद्य तरी हव होत किंवा करमणूक तरी हवी होती.

ते अगदीं लहान झाले. आठ वर्षाचे झाले. खूप खोडया केल्या. शाळेत जायचं नाहीं म्हणून हटून बसले, मग थोडासा मार खाल्ला, कैऱ्या चिंचा चोरून खाल्ल्या, मग दहा बारा वर्षाचे झाल्यावर अभ्यास करूं लागले. शाळेंत जाऊ लागले. आणि उरलेल्या वेळात शाळेचा खेळ खेळूं लागले. रस्त्यात एखादी बैलगाडी गाठावी आणि शाळेपासून घरापर्यंत तिच्यात बसून याव. कधीं कधीं घोडयाच्या शेपटीचा केस उपटून आणावा. रस्त्यांतलीं कुत्रीं माजरं घरीं आणावींत. शेळ्या धरून त्याच्या आचळानाच तोंड लावून दूध प्याव.

अशा अनंत गोष्टी केल्या. प्रभाकरपत मोठे होत होते. मॅट्रिक झाले. कॉलेजात गेले. कॉलेजांतले दिवस आठवले मात्र आणि त्यांना असं वाटलं कीं आयुष्यातल्या काव्याला इथें सुरवात झाली. एका नव्या दालनाच्या निळ्या पडद्याला आपण स्पर्श केला. याचवेळीं आपण एकदम उंच झालों. याचवेळीं आपण विस्फारित नेत्रांनी पाहूं लागलो. कॉलेजांत येण्यापूर्वी

आखाडयातल्या मातीचा तो लाल मातकट रग तेवढा आपल्याला माहीत होता. जगांत जसा काहीं तोच एकुलता एक रग असल्यासारखे आपण त्या मातीवर खुष होतो. पण कॉलेजच्या त्या भव्य इमारतीच्या पहिल्या पायरीवर आपण पाऊल ठेवल आणि मग किती प्रकारचे रग दिसले आपल्याला. शाळेंत आधीं मुली मुळीं नव्हत्याच. आणि मास्तर येत ते सुध्दा ठराविक रगाचे कपडे घालून. रेजे मास्तराचा तो विटकरी रगाचा कोट वर्षानुवर्ष आपला तोच होता. हल्लीं फॅशनेबल बायका टिचभर कपाळावर मळवट भरल्यासारख रुपया एवढ कुकू लावतात आणि मग त्याच्या कपाळाआधीं त्याच तें कुकूच आपल्याला दिसत. जणु काहीं त्याचा चेहरा ही त्या भल्या मोठया टिळ्याची नुसती पार्श्वभूमि ! त्या-प्रमाणें रेज्याचा तो कोटच आधीं दिसायचा. तो विटकरी रगाचा, वाढत्या अगाचा, लाबलचक कोट दिसला कीं डोळे मिटून समजाव या कोटाच्या आंत रेजे मास्तराचा थकला भागला कृश देह लपून बसलेला आहे.

पण कॉलेजात ? कॉलेजात प्रत्येक प्रोफेसरांचा पोशाख वेगळा. झुळ-झुळीत आमचे प्रोफेसर आपटे धोतर नेसत. वर काळा कोट डोक्यावर टोपी, पायात मोजे आणि मोज्यावरून कधीं बूट, कधीं वहाणा तर कधीं जोडेसुध्दा. पण आपट्याचा देह केवढा ! एखादा डोंगर चालत आल्या-सारखा वाटे. आम्ही तेव्हा थट्टेन आपापसात म्हणत असू कीं डोंगरे बालामृताच्या सगळ्या बाटल्या बहुधा यांनींच सपविल्या. एवढच नव्हे तर त्यात वर्षानुवर्ष आंघोळ केली असली पाहिजे. प्रोफेसर आपटे म्हणजे डोंगरे बालामृताची चालती बोलती जाहिरात होती. आपट्याना बघितलं कीं शाळेंतल्या रेजे मास्तराची मला आठवण होई आणि वाटे रेजे मास्तर म्हणजे बालामृत घेण्यापूर्वीची अवस्था आणि प्रोफेसर आपटे म्हणजे बाला-मृत घेतल्यानंतरची अवस्था.

प्रोफेसर आपट्यांच्या उलट म्हणजे आमचे प्रोफेसर शिरगावकर. रोज नवा सूट. चेहऱ्यान देखणे, शरीरानं बाधेसूद. त्यांचा चेहरा बघूनच बरं वाटायचं. स्वच्छता, टापटीप याच मूर्तिमत चित्र म्हणजे प्रोफेसर शिरगांव-

कर. आल्याबरोबर आर्धी फळा पुसायचे. मग दोन मिनिट कोटाच्या कॉलरवर हात ठेऊन सर्व विद्यार्थ्यांच्याकडे नजर टाकावयाची. नतर शिकवायला सुरवात. वाणी अगदीं स्वच्छ, स्पष्ट, आणि आवाजहि गोड होता. त्या बोलण्याला एक प्रकारचा सूर होता. आम्ही विद्यार्थी त्याच्यावर खुष होतो. ते कधीं सूट घालून येत, कधीं धोतर नेसून येत. पण कोणत्याहि पोशाखांत ते सुदरच दिसत. त्याच रूप आणि त्याचे कपडे यांत कोणामुळे कोणाला शोभा येत होती हे सागण मोठ कठीण होत. पण एवढ खर कीं त्यांचे ते कपडे इतके सुदर आणि व्यवस्थित शिवलेले असत कीं त्या कपडयांत ते अगदीं ठाकठीक बसत.

असे किती तरी प्रोफेसर होते आणि त्याच्या त्या निरनिराळ्या तऱ्हा होत्या. त्यावेळीं कॉलेजांत मुली सर्रास येऊ लागल्या नव्हत्या. आणि ज्या येत त्या अगदीं नऊवारी नेसून म्हणजे तेव्हा पाचवारीची फॅशन फारशी नव्हतीच. पण कशाहि आल्या तरी भिऱ्या सशासारख्या येऊन बाकावर निमूटपणें बसत. आणि तास सपला कीं आल्या वाटेन नाकासमोर पहात तशाच निघून जात. त्या कुठे पहायच्या नाहींत, कुणाशीं बोलायच्या नाहींत, मग प्रेम कुठून करणार ? सर्कशींतल्या वाघासमोर शेळी नाहीं कां चारा खाऊन एकदाची चोरट्या अगान निघून जात ? तशा या रोज वाघाच्या पिंजऱ्यांत येत आणि तास सपला कीं जीव घेऊन परत जात.

पण त्या डोळे मिटून जात होत्या तरी आम्ही काहीं डोळ्यावर ढापणं बांधलेलीं नव्हतीं आधींच कॉलेजांत मुली फार थोडया. त्यांतून काकू टाइप बऱ्याच होत्या. या काक्या माम्या वगळून ज्या उरत त्या फारच थोडया रहात. त्यांच्याकडे पहायला कांहीं कोणाची मनाई नव्हती. असली तर ती फक्त आपल्याच मनाची लाज. पण कॉलेजांतलीं मुल लाजेची भीडमुर्वत थोडे दिवस ठेवतात. मग सगळ्यानाच कळत कीं सारेच आपल्या सारखे आहेत. शिवाय नुसत मुलींच्याकडे पाहिल्यान काय होत ? बरं ज्यांच्याकडे पहावं असं वाटण्याइतपत ज्या सुस्वरूप होत्या त्यांनी तरी कर्व्यांच्या कॉलेजांत न जातां आमच्या कॉलेजांत धांपा टाकीत काय म्हणून यावं ? त्यांना तरी काय हेंच हव होतं. पुरुषांच्यांतच मिसळण्याची

त्यांचीहि आंतरिक इच्छा होती. आम्ही हे उघड म्हणत होतों; त्या म्हणत नव्हत्या. हाच तर स्त्री पुरुषातला खरा फरक आहे नुसत्या पुस्तकाचीं ओझीं वाहून वाहून कां त्या आमच्या बरोबरीला येणार होत्या ? पण बापड्या कॉलेजात येत होत्या. शिकत होत्या.

बाकी मला तरी हा अनुभव फक्त एक वर्षाचा. इंटरपासून माझी लाईन बदलली. पण इंजिनिअर होणारे विद्यार्थी रुक्ष असतात अस नाही. पहिल्याच वर्षात सुमन कर्वे नावाची एक अठरा वर्षांची मुलगी येत असे. तिचा ताबुस गौरवर्ण, तें सरळ पण किंचित् अपुर नाक आणि तिची ती लाडिक हनुवटी, याचा मोह तर कोणालाहि पडलाच असता. पण तिचे ते सुदर, दोन स्वप्नाळु डोळे. जणु भिवयाच्या रेषेवर तीं दोन निळीं कमळ फुललीं होतीं. त्या वेळचे आईबाप मुलांचीं नाव ठेवण्याच्या बाबतींत विशेष चोखदळ नव्हते. मुलगी कशीहि असली तरी काशी, गगू, यमी, साळू, हींच नाव ते त्यांना देत. त्या मानान हिच सुमन हें नाव कांहीं वाईट नव्हतं पण मला मात्र तेव्हासुद्धा कल्पना सुचली की हिच नाव नीलिमा ठेवायला हव होत. मनातल्या मनात मी तिला नीलिमाच म्हणत होतो. कॉलेजात गेलों कीं ती निळ्या डोळयाची जोडी कुठें दिसते हें पहाण्याची माझ्या मनाची धडपड चाले. कॉलेजच्या फाटकातून आत शिरताना किंवा वर्गात बाकावर बसलेली मी तिला पाहिली कीं माझ्या मनाला जरा स्वस्थता येई. जणु काहीं ती कॉलेजात आली कीं नाहीं, बाकावर बसली कीं नाहीं, हें पहाण्याची जबाबदारी माझ्यावर कुणी तरी टाकलीच होती. पण आपला तरुण मनाचा नादिष्टपणा. तरीसुद्धां माझ्या आयुष्यातल्या कांहीं दिवसावर ही मुलगी आपला हक्क गाजवून जाणार आहे याची मला कल्पना नव्हती. प्रेमोत्तर विवाहाची लाट त्यावेळीं पुण्यामुबईला आली होती. ऐकत होतो कीं हल्लीं तरुण मडळी आधीं प्रेम करून आपल्याच जबाबदारीवर लग्न उरकून घेतात मला मोठी मौज वाटे या लोकांच्या प्रीतिकथा ऐकून. आज काल प्रेमभगाच पीक आल आहे. त्यावेळीं प्रेम करू द्यायलाच पालक मंडळी तयार नव्हती. त्यामुळें रोज, नवनव्या, खऱ्याखोट्या बातम्या ऐकायला मिळत. कोणी एक पारशी मुलगा आणि एक पारशी

मुलगी ह्यांनीं म्हणे लग्नाला परवानगी न मिळाल्यामुळें एकमेकाना मिठया मारून नदींत जीव दिला, कोणी म्हणे पळून गेली, एका हिंदु मुलीन एका मुसलमानाशीं लग्न केल, एका ब्राह्मण मुलान मराठ्याच्या मुलीशीं विवाह केला, अशा नाना तऱ्हेच्या कथा मी रोज ऐकत होतों. त्यावर आम्ही उलट सुलट चर्चाहि करीत होतों. आणि चर्चेतून अखेर काहींही निष्पन्न होत नव्हतं. माझ्या एकच गोष्ट ध्यानात आली होती, आणि ती ही कीं प्रेम ही चीज मोठी विलक्षण आहे. तिचा सारा खेळ माणसाच्या जीवाशीं आहे. ती एखाद्याला जीव लावते तर एखाद्यावर जीव देण्याची पाळी आणते. आमच्या घरात यावर जी बोलणीं होत त्यात माझ्या मनान एवढी एकच गोष्ट टिपून ठेवली होती, बाकी मोठ्या माणसाची सारखी बडबड चाले कीं प्रेम हें अखेर मृगजळ आहे. स्त्रीपुरुषातलें प्रेम म्हणजे केवळ शारीरिक आकर्षण आहे. प्रेमात पडलेला माणूस पागल होतो. त्याला सारासार विचार रहात नाहीं. शहाण्यालासुद्धा वेडं करण्याच प्रचंड सामर्थ्य या दोन अक्षरीं शब्दात सामावलेल आहे.

हा सारा काथ्याकूट ऐकून ऐकून मला अगदीं कंटाळा आला होता. कारण मी असं पहात होतों कीं मोठ्या माणसानीं घरात कितीहि कंठशोष केला तरी तरुण माणसाच जें व्हायच तेच होतं होत. त्यानीं प्रेमसागरात धडाधड उड्या घ्याव्यात, आणि काठावर बसलेल्या म्हाताऱ्या माणसानी आपल्या अनुभवाचें ज्ञान म्हणून त्याना परत बोलवाव. पण माणसाला तारुण्यातून परतून पुन्हा बालपणात जाण, तोंडातून निघून गेलेले शब्द पुन्हा गिळून टाकणं आणि उतारावर वहाणाऱ्या पाण्यान डोंगर चढूं लागण हें जेवढं अशक्य आहे तेवढंच प्रेमात पडलेल्या माणसान बेहोष न होणं अशक्य आहे. उभ्या आयुष्यांत माणूस एकदांच स्वतःला विसरतो उभ्या हयातींत माणूस एकदाच जीव कुर्बान करून टाकायला तयार होतो. आयुष्यभर माणसाला शुद्धीवर राहून विचार करावाच लागतो म्हणूनच कीं काय त्याच्या जीवनात असे काहीं दिवस येतात कीं, त्यावेळीं त्याला सुधबुध विसरून आपल्या प्रेमाशीं तन्मय होऊन रहावसं वाटतं. आपल्या प्रेमाखातर जगावर लाथ मारायला तयार झालेले, आपल्या प्रेमासाठीं जग

दाढेखालीं भरडून टाकायला तयार झालेले, आणि घरादारावर तुळशीपत्र ठेऊन प्रेमविवाहासाठींच, सपत्नीच्या आणि नात्याच्या माणसांचा त्याग करायला उत्सुक असलेले प्रेमवीर मी पहात होतों

मी नुसता पहात होतो. आपणहि उद्यां या सर्व अनुभवांतून तरगत तरगत प्रवास करणार आहोंत याची त्यावेळीं मला कल्पना नव्हती. या साऱ्याचा विचार करताना माझ्या डोळ्यासमोर एक चित्र नेहमीं उभ रहात असे, सुमन कर्वे ! तिच्या त्या सुदर स्वप्नाळु डोळ्यांच्या तारका, तिचा तो ताबूस गौरवर्ण, तिच तें अपुर नाक आणि तीं वर उचललेली लाडिक हनुवटी ! काय असेल ते असो, पण ही मुलगी मला आवडत होती इतके लोक आज काल प्रेम करतात. आपणहि या मुलीवर प्रेम केल तर ? असा गमतीचा विचार माझ्या मनात येई. या नुसत्या विचारावरच मी खुष होऊन जाई. प्रेमांत पडण्याच्या आधींची ही पायरी होती हे मला तेव्हां माहीत नव्हत त्यामुळें माझ्या दारावर ही मुलगी प्रथम थाप मारणार आहे याची मला कल्पना नव्हती. माझ्या गुलाबी कोड्याच उत्तर सुमन कर्वेच्या गालावर लिहिलेल असणार आहे या भविष्याची मला मुळींच दाद नव्हती. माझी प्रणयिनी म्हणून पहिला स्पर्श मी सुमन कर्वेला करणार आहे याची मला कल्पना नव्हती. पण हो, सुमन कर्वे ही माझ्या आयुष्यातील पाहिली मुलगी. सुमन कर्वे ही माझ्या तारुण्यातली पहिली मैत्रीण. माझ्या प्रीतीच पहिल पुष्प मी सुमन कर्वेला अर्पण केल. हिनच माझ्या दारावरचा निळा पडदा प्रथम सरकवला. या मुलीनच मला गुलाबी रगाच्या छटा दाखवल्या आणि प्रेमांत बेहोष होण्याचा आनद याच मुलीच्या बाबतींत मी प्रथम उपभोगला. सुमन कर्वेनच माझ्या आयुष्यात प्रथम डोकावून पाहिल. तिच्या पावलाबरोबरच माझ्या आयुष्यांत प्रणयाचा पहिला सुगध दरवळला.

———

# २

पण या सगळ्या पुढल्या गोष्टी झाल्या. तिची माझी ओळख काहीं कॉलेजात झाली नाहीं. तिची माझी ओळख होण्याला जें कारण घडलं, ज्या परिस्थितीचा फायदा आम्हाला मिळाला, ती परिस्थिती जर कधीं अस्तित्वात आलीच नसती तर सुमन कर्वे ही माझ्या दृष्टीन जगांतल्या अनेक सुंदर मुलींपैकीं एक मुलगी एवढी एकच आठवण शिल्लक राहिली असती. कदाचित् मी तिला विसरूनहि गेलो असतो. कारण अशा किती तरी गोष्टी आपण पाहतों आणि न पाहिल्यासारख्याच विसरून जातों. निदान माझ्या स्मृतीचा पडदा तरी कोळयाच्या जाळयासारखा आहे. मला आठवणी करायलाच आधीं मुळीं वेळ नसतो. मला वाटत जुन्या आठवणींच्या रेकॉर्डस् पुन्हा पुन्हा वाजवीत राहण हा म्हातारपणचा उद्योग आहे. सुमन कर्वेची आठवण कदाचित् मला म्हातारपणीं आली असती. पण बहुधा झालीच नसती. कारण तरुणपणीं ज्याला विसरभोळेपणाचा अभिमान वाटतो तिथें म्हातारपणीं हा अभिमान धरायलाहि तो विसरूनच जायचा. सुमन कर्वे ही मुलगी म्हातारपणापर्यंत माझ्या अंतर्मनांतूनहि पुसून गेली असती. पण तसं व्हायच नव्हत. ती माझ्या आयुष्यांत येणार होती. प्रथम येणार होती. आणि निघूनहि जाणार होती.

त्या दिवशीं सकाळच कॉलेज होत. कपडे घालून, हवीं तीं पुस्तकं घेऊन “ आई, जातों ग ” अस घाई घाईन म्हणत मी आमच्या खोलीच्या बाहेर पडलों, तों सुमन कर्वे आमच्याच समोरच्या खोलींतून पुस्तकाची चवड छातीशीं धरून बाहेर पडण्याच्या पवित्र्यांत उभी होती. मी तिच्याकडे चकित दृष्टीनं पाहिलं आणि रस्ता चालूं लागलों. सुमन कर्वे आमच्या वाडयात—आमच्या म्हणजे आमच्या मालकीच्या नव्हे— पण ज्या वाडयात आपण रहातो तो वाडा आपलाच नव्हे तर कोणाचा ? एक परकी मुलगी आमच्या वाडयांतून कॉलेजांत जायला कशी निघाली याचं मी मनाशीं आश्चर्य करीत होतो. कारण आमचा वाडा

एवढा सुधारलेला नव्हता. सार पेशवाई काम होत. आमच्या वाड्यातल्या सुमनएवढ्या मुलींना गव्हले वळायच माहीत होत. म्हणून मला फार आश्चर्य वाटल. शिवाय सुमन कर्वे आमच्या वाड्यात कधी रहायला आली? ती ज्या खोलींतून बाहेर पडली तिथल बिऱ्हाड जागा सोडून जाणार होतं हे मला माहित होत. पण त्या जागीं सुमन कर्वेंच्या कुटुंबाची प्रतिष्ठापना होणार होती याची मला मुळींच कल्पना नव्हती. आतासुद्धा विचार करताना कर्वे मंडळी तिथे रहायला आली आहेत कीं दुसऱ्या कोणाच्या घरीं सुमन कर्वे पाहुणी आली आहे ही शंका मला होतीच. कॉलेजात गेल्यापासून कॉलेज सुटेपर्यंत या शंकेभोंवतीच मी पिंगा घालीत होतों. खरं म्हणजे अितका विचार करण्याच मला काय कारण होत? सुमन कर्वेंन कुठे रहाव हे ठरविण्याचा अधिकार माझा नव्हता. ती आमच्या वाड्यात राहील नाहीं तर पृथ्वीच्या पाठीवर कुठेहि राहील. किंवा कुठंच रहाणार नाहीं. हा प्रश्न तिचा होता. तिच्या घरातल्या मंडळींचा होता, फार तर जागा देणाऱ्या घरमालकाचा होता. पण माझा मात्र मुळींच नव्हता. पण वर्गात लक्ष द्यायच सोडून मी याच गोष्टीचा विचार करीत होतो.

घरीं गेल्याबरोबर मी सहज म्हणून आईला विचारलं "आपल्या वाड्यात नवीन बिऱ्हाड आल आहे वाटत?"

"हो. कर्व्यांच बिऱ्हाड आल आहे."

आईचे ते शब्द ऐकले आणि अस वाटल कीं ज्या गोष्टीवर विचार करण्याचा अधिकार माझा नव्हता ती गोष्ट मात्र नकळत माझ्याच मनाप्रमाणें घडून आली. कारण नसताना मला बर वाटल.

आणि तेव्हापासून ती दोन निळीं कमळ मला रोज दिसू लागलीं. आम्हीं माडीवर रहात होतों, आणि ती समोरच्या घरांत तळमजल्याला रहात होती. घरांत हीच मोठी मुलगी. धाकट्या भावंडाना खेळवायला, नळावरून पाणी न्यायला, दळण आणायला, कॉलेजात जाण्यासाठीं तिच्या आतबाहेर कितीतरी खेपा होत. सहज म्हणून मी गॅलरीच्या कठड्याला रेलून उभा राही आणि सुमन मला रोजच्या रोज, अगदीं सहजगत्या दृष्टीस पडे.

एवढं घरचं काम करीत होतीना ! पण तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा भोळा भाबडा सात्विक भाव होता. तिचे ते निळे डोळे म्हणजे दोन निष्पाप फुलांच उमलण होत. उमलत्या फुलान हसाव तसेच ते हसत. मला नेहमीं वाटे कीं फुल जगाच्या व्यवहाराकडे कधीं पहात असतील कां ? आपल्या स्वप्नातच ती डोलत रहायची. सुमनहि आपल्या डोळ्यानी जणु स्वप्नाचा फुलोरा पहात होती. नळाखालीं कळशी लावून ती भरण्याची वाट पहात सुमन उभी राही. पण तिची नजर या व्यावहारिक जगाचे पडदे बाजूला सारून जणु निराळ्याच सृष्टीकडे पहात असे. कळशी भरून वाहून गेली तरी तिला त्याची खबर नसे. जणु परांच्या मऊ गादीवर बसणारी ही परी चुकून कव्र्यांच्या घरच पाणी भरायला आली होती. या जगातली ती नव्हतीच. तिचा देश कोणता तरी दुसराच होता. आणि या जगात ती पाहुण्यासारखीच आली होती. छे ! तिच्या त्या सुकुमार हातान पाणी भराव, आपल्या शेंबड्या लेंबड्या भावडाची उसाभर करावी·आणि एका किराणा मालाच्या दुकानदाराची मुलगी म्हणून जगाव ही सारी पार्श्वभूमि तिच्या चित्राला फार विसगत होती.

पण तें चित्र पहाण्याचं तर मला वेडच लागल होतं. आणि ही पार्श्वभूमि मुकाट्यान पहाण्याशिवाय गत्यतर नव्हत.

अस वाटे कीं किती दिवस आपण हिला नुसती डोळ्यानीं पहाणार ? हिची आणि आपली ओळख ?

आणि तो दिवस एकदांचा उगवला. त्यांच्याकडे सत्यनारायण होता. त्याच आमत्रण द्यायला ती आली होती. आमत्रण होत आईला. पुरुषांचं आमत्रण मागून येणार होतं. पण ती आली तेव्हां आई बाहेर गेली होती. घरांत फक्त मीच एकटा होतों. ती आली ती थेट आंतल्या खोलींतच गेली. पण आंत कोणीच नाहीं असं पहातांच पुन्हां परत आली. मी म्हणालों, " आई बाहेर गेली आहे देवाला. काहीं काम होतं तुमचं ? "

" हो. "

" मग बसा ना. " मी खुर्ची पुढें करीत म्हणालों, " आईला कांहीं निरोप सांगायचा आहे ? "

" हो. उद्यां सत्यनारायण आहे आमच्याकडे. तेव्हा त्यांना तीर्थ-प्रसादाला बोलवायला आलें होतें. "

ती खालीं पाहूनच म्हणाली. तरी पण एक दोन वेळा तिनं माझ्याकडे पाहिलच. हातान पदराच टोक ती आपल्या नाजुक बोटाभोवतीं गुंडाळीत होती.

" अस्स होय ! आई आली कीं मी सागतों निरोप तिला. " एवढं मी म्हणतांच ती जायला म्हणून खुर्चीवरून उठली. तोंच मी म्हणालों " आमच्याच कॉलेजात आहात वाटत ! "

" हो. " ती हसून म्हणाली. आणि तिच्या त्या शुभ्र दाताबरोबरच ते दोन निळे डोळेहि हसले किती निष्पाप आणि गोड होतं तें हसण !

आतां काय बोलाव याची मला पचाईत पडली. अनोळखी माण-साशीं एकदम बोलायच तरी काय हा प्रश्नच असतो. त्यांतून ही तरुण मुलगी सुदर, आणि शिवाय निळया रगाची प्रभा तिच्या डोळयांत.

मी नुसता चकित नेत्रांनीं तिच्याकडे पहात होतों. काय बोलाव याचा विचार करीत होतों. हातान टेबलावरचा पेपरवेट चाळवीत होतों. वेळ फुकट जात होता याची जाणीव होत होती तरी सुचत मात्र कांहींच नव्हत.

माझ्या त्या न सुचण्यानच अखेर घात केला. " बर आहे " असं म्हणून ती जायला निघाली आणि दुसऱ्याच क्षणीं जिना उतरून गेली सुद्धां. मी नुसताच तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात राहिलों.

ती गेली आणि माझा जीव नुसता चुटपुटला. माझा मलाच राग आला. कॉलेजांत जातों आपण, पण एका सुदर मुलीशीं कांहीं आपल्याला दोन मिनिट धड बोलतां आल नाहीं. तिच्याशीं कितीतरी बोलाव अस मला वाटत होत. मात्र काय बोलाव हें जसं मला सुचलं नाहीं तसंच

तिच्याशीं मला काय बोलायच होत हेंहि मला कधीं समजल नाहीं. वाटत मात्र होत कीं खूप खूप बोलाव.

अस का होऊ लागल हें मला तेव्हा समजत नव्हत. माणसाला आपल्या चालीच पहिल पाऊल आपण कधीं टाकल हे जस आठवत नाहीं तसंच शृंगाराचीं पावल आपल्या मनात कधीं उमटू लागलीं याचा त्याचा त्यालाहि कधीं पत्ता लागत नाहीं.

ती निघून गेल्यावर मला अस वाटल कीं हिची माझी ओळख कांहीं आता कधीं व्हायची नाहीं. एक चागली, आपणहून आलेली सधी आपण वाया घालवली. सधी आपल्यापुढें हात जोडून उभी होती. आपण तिचं स्वागत केल नाहीं. मूर्खासारखे, मुखदुर्बळासारखे वागलो आपण. आता हळहळून काय उपयोग ? तरुणपणात माणूस केवढा उतावीळ असतो! एखादी गोष्ट आगेमागे घडण शक्य आहे यावर त्याचा विश्वासच बसत नाहीं. मोठी चुटपुट लागली. जीव अगदीं हुरहुरून गेला. मन भारी बेचैन झाल.

पण त्याच दिवशीं रात्रीं बारा वाजता ती मलाच उठवायला आली. दार उघडून जेव्हा मीं सुमनलाच दरवाजात पाहिली तेव्हा आश्चर्यानं मी मूढ होऊन गेलों. माझा माझ्या डोळ्यावर विश्वासच बसेना. आपण झोपेंत तर नाहीं ना ! पण झोपेंत असण कस शक्य होत ! स्वप्नात, झोपेंत मला तीच दिसत होती. आणि आता तिला प्रत्यक्ष समोर पहाताच माझी झोप खाडकन् उडाली. पण हें खर होतं का! मी नुसता वेडयासारखा पहात राहिलो.

माझ्या त्या आश्चर्यमूढ स्तब्धतेचा भंग करीत ती म्हणाली, “ बाबाच्या पोटात दुखतंय फार. घरची सगळीं औषध देऊन झालीं पण थाबत नाहीं. आई म्हणाली कीं डॉक्टरना आणायला हवं. रात्र झाली आहे. यावेळीं आमच्या घरात कोणी बाहेर जाण्याजोगं नाहीं. तुम्ही आणता डॉक्टरला बोलावून ? ”

मी अंगांत कोट घालता घालताच म्हणालों, “ हा चाललोंच डॉक्टर-कडे. तुम्ही घरीं जा. तेवढ्यात मी आलोंच. ” अस म्हणालों, आणि

पुन्हा लगेच म्हणालों, "थांबा ह. जिन्यांत अंधार आहे. मी येतों तुमच्याबरोबर."

जणु काहीं ती आली तेव्हा जिन्यांत उजेड होता! येताना जर ती अंधारातून येऊं शकली तर जातांना तिला अंधार का चालला नसता? पण तीहि थांबली. आणि माझ्या मागोमाग जिन्यावरून येऊ लागली. मी बॅटरीचा उजेड दाखवीत होतों. पण झाल मात्र उलटच. ती एकटी वर आली तेव्हाच ती न धडपडता वर आली होती. पण आता माझी सोबत आणि बॅटरीचा उजेड असूनहि ती अखेर एक पायरी चुकलीच. आणि धडपडत येऊन माझ्या अंगावर पडली. वास्तविक तिला स्पर्श करण्याची इच्छा या वेळपर्यंत माझ्या मनात उद्भवली नव्हती. पण प्रसगच असा आला कीं तिनच येऊन माझ्या कोटाची बाही धरली. मग तिचा हात धरून तिला सावरण हें त्यावेळीं माझ कर्तव्य नव्हत काय?

"लागल नाहीं ना?"

"छे छे!" ती शरमून गेली होती. आपल्याला सावरीत लगबगीनं जिना उतरीत ती म्हणाली. "मला मुळींच लागल नाहीं. तुम्ही लौकर घेऊन या डॉक्टरला. उशीर करूं नका हं. मी जातें."

असं म्हणून ती क्षणभर उभी राहिली. बॅटरी दाखविण्याच्या निमित्तान मी चटकन तिच्या डोळ्यावर बॅटरी धरली. आणि चांदण्या रात्रीं चंद्रकिरणांनी न्हाऊन निघालेल्या निळ्या सरोवरासारखे तिचे निळे डोळे मला दिसले.

माझा मीच हरखून गेलों. आणि सुमनचा विचार करीत करीत मी रस्ता चालू लागलों.

या प्रसंगापासून आमची जवळ जवळ रोज गाठ पडू लागली. एकमेकांकडे पाहून हसतां हसतां मनमोकळेपणान बोलण्यापर्यंत आम्ही येऊन ठेपलों होतों. पण भेटण्याची इतकी सवय झाली कीं एखाद्या दिवशीं गाठ पडली नाहीं, थोडा वेळ तरी एकमेकाशीं बोलता आल नाहीं तर आम्हाला चुकचुकल्यासारखं होई. दुसऱ्या दिवशीं भेटेपर्यंत मग मनाला

सारखी हुरहुर लागून राही. आपणच आपल्याजवळ नाहीं अशी कांहीं चमत्कारिक जाणीव मनाला अस्वस्थ करुन सोडी. साऱ्याना चुकवून, विशेषतः सुमनच्या घरातल्या मडळींना न कळता भेटण हें एक मोठ दिव्यच होत. पण तरीहि मनाची ओढ एवढी विलक्षण होती कीं तशाहि परिस्थितींत आम्ही भेटत होतों. पधरा मिनिट, अर्धातास एवढा वेळ मिळाला तरी आम्हांला बर वाटे. पण जेव्हा एवढा वेळ मिळण शक्य नसे तेव्हां आम्ही एकमेकाना लाब लाब पत्र लिहून आपल मनोगत व्यक्त करीत होतों. त्या पत्रांचीं किती पारायण करीत होतों तें आमच आम्हा-लाच माहीत. सुमन माझा निरोप घेऊन गेली कीं तिन दिलेल पत्र मी हृदयाशीं धरी. पुन्हां पुन्हा वाची. रात्रीं निजतांनाहि वाची. एखाद्या भाविक माणसान पोथीच्या आवृत्त्यावर आवृत्त्या कराव्या तशी मी ती प्रेमपत्रं पुन्हा पुन्हां वाचीत होतों. हृदयाशीं धरीत होतों. त्याची चुबन घेत होतों. सुमनच्या नावाचा जप तर मी रात्रदिवस करीत असे. सुमन म्हणजे माझ सर्वस्व होत. तिच्याशिवाय खर म्हणजे करमत नव्हत. जेवताना, खाताना, काम करतांना, अभ्यास करतांना, फिरायला जाताना, झोपतांना, झोपेंत सुद्धां मला सुमन दिसत होती सकाळीं उठल्यावर मला पहिली आठवण येई ती सुमनची. उठल्याबरोबर असें वाटे कीं तिचं दर्शन आधीं झाल पाहिजे.

सुमनच्या ओढीन मी खरच वेडा होत होतों. त्यामुळें भेटण्याची अनिवार तळमळ मला तिच्याकडेच खेचीत होती. 'आज नको' म्हणून मनाला किती बजावल तरी भेटायची वेळ झाली कीं घरात स्वस्थ बसवत नसे. त्यामुळें भेटण्याचे कांहीं प्रसंग आपोआप येत होते तरी कांहीं आम्ही मुद्दाम आणीत होतों. पण एकमेकांशीं बोलण्याची सधी मात्र आम्ही वाया दवडली नाहीं. तिच्या ध्यासान जसा कांहीं मी वेडा झालों होतों. तशीच तीहि माझ्या वेडाचा ध्यास घेऊन बसली होती. प्रथम प्रथम आम्ही खूप बोललों. तें बोलणें कधीं सपतच नसे. वेळ पुरत नसे. आम्ही एकमेकांवर अनुरक्त आहोंत हें आम्हांला समजत होतं आणि पत्रांतून तेंच सारं लिहीत होतों. पण त्याचा तोंडानं उच्चार मात्र

होत नव्हता. जी गोष्ट पत्रांत लिहायला जमत होती तीच गोष्ट उघड बोलायला सकोच वाटत होता.

घरीं असलों म्हणजे मी तिची वाट पहात बसायचा. काहीं तरी निमित्यान ती वर येईल याची मला खात्री असे. पण केव्हा येणार याचा नेम नसे. त्यामुळें ती प्रत्यक्ष वर येईपर्यंत नुसता वाट पाहण्यांत वेळ जाई. माझ्या भोवतीं अभ्यासाच्या पुस्तकाचा मात्र कायम पसारा असे. जसा काहीं मी चोवीस तास अभ्यास करीत होतों. एक क्षणहि मी अभ्यासाशिवाय घालवीत नव्हतो. पण अस करण्याशिवाय गत्यतर नव्हतं. मला कोणाशींहि बोलण्याची इच्छा होत नव्हती आणि आपल्याशीं कोणी बोलू नये म्हणून मला तो अभ्यासाच्या पुस्तकाचा पसारा घेऊन बसावं लागे.

कित्येकदा बाहेर फिरायला जाण शक्य नसे. पण कधीं कधीं कॉलेजचे तास बुडवून आम्ही कुठें तरी लाब जाऊन झाडाखालीं बसत असू. एखाद्यावेळीं ती मावशीच्या घरी जाई आणि त्यावेळीं जेवढा वेळ मिळण शक्य तेवढा आम्ही घेत असू. याप्रमाणें जास्तींत जास्त एकमेकाच्या सहवासात रहाण्याची आमच्या जीवाची ओढ असे.

सुमनची व माझी भेट आणखी एका वैशिष्ट्याची असे, काहीं ना काहीं ती माझ्यासाठीं घेऊन येई. कधीं गुलाबाच सपर्ण पुष्प आणून ती माझ्या कोटाला लाऊन देई तर कधीं माझ नांव विणलेले हातरुमाल मला आणून देई. आईन दिलेली खोबऱ्याची वडी, पेरू हें सुद्धा तिच्या हातात असे. मी म्हणे " हें काय ? "

" खायची वस्तु आहे ही. "

" अस्स. ! खायच्या वस्तु हें समोरच माणूस खात नाहीं वाटतं. "

" खातं. पण समोरच्या माणसाला दिल्याशिवाय नाहीं खात. "

" असा नियम केला आहे वाटत ? "

' अस स्वप्न मी रोज पहात असतें खरी. "

" वेडी आहेस. नुसतं स्वप्नच काय म्हणून पहायचं ? नीलिमा, "

तिन चमकून माझ्याकडे पाहिल. ' कां दचकलीसशी ? लग्नाआधींच नांव ठेवल म्हणून रागावलीस नाहीं ना ? " तिची हनुवटी वर उचलीत मी म्हणालों. आणि ' इश्श ' म्हणून तिन आपली मान खालीं केली. " आपण एकमेकाचे व्हावें अस नाहीं वाटत तुला ? " अस म्हणत तिच्या सुकुमार हाताना धरून मी तिला जवळ ओढली. आणि उत्तरा· दाखल तिन आपल मस्तक माझ्या छातीवर ठेवल.

किती तरी वेळ त्या स्पर्शसुखाचा अनुभव आम्ही उपभोगीत होतो. अखेर अधार पडला. आम्ही मोठ्या कष्टान जायला निघालो. तिच्या खांद्यावरून हात टाकीत मी म्हणालो, " चल, आता जाऊ या आपण."

" एक मिनिट थाब्रा ह. " अस म्हणून तिन हातातल्या पिशवींतून एक स्कार्फ काढला. आणि तो माझ्या गळ्याभोवती गुडाळीत म्हणाली " चला आता. "

" हें काय ? "

" याला स्कार्फ म्हणतात. "

" कुणी केला हा ? "

" जिन करायचा तिनच केला. "

स्कार्फच्या मऊ मऊ लोकरीवरून हात फिरवीत मी मोठ्या समाधानाच सुख अनुभवीत होतों. त्या नादात तिच्याशीं मी बोलायचहि विसरून गेलों. तिला काय वाटल कोण जाणें ! म्हणाली " रागावलात ? "

मी रागावलों कीं काय हा प्रश्न विचारायचा तिच्या मनाला एक छंदच होता. मी रागावलो नाहीं ना हा प्रश्न मला ती दर भेटींत एकदां तरी विचारीच.

मी म्हणालो " रागवायला काय झाल ? "

" मग बोलत नाहीं तें कांहीं ? "

" अस वाटतं कीं कांहीं बोलूं नाहीं. नुसतं तुमच्याकडे पहात रहाव."

" पण स्कार्फ कसा झाला आहे ? "

" छान झाला आहे. "

" आवडला तुम्हाला ? "

" तूं केलेली कोणतीहि वस्तु मला आवडेल नीलिमा. "

माझ्या या उद्गारान स्वर्ग तिला ठेगणा वाटला. माझा डावा हात आपल्या उजव्या हातांत धरून आणि मला अगदीं बिलगून ती चालू लागली.

वरील प्रसगानतर, म्हणजे आमच्या लग्नाच आम्ही ठरवल्यानतर दूरत्वाची जाणीव कमी झाली. आणि आपलेपणाची हक्काची जाणीव वाढू लागली. पूर्वीपेक्षाहि अधिक वेळा भेटण्याचा आम्ही प्रयत्न करू लागलों. ती तर एक दिवस मला म्हणाली " कधीं करायच आहे लग्न ? "

" का बर ? "

" का काय ? मला हल्लीं काहीं सुचत नाहीं. आपण लौकर लग्न करू या. अस वाटत कीं कॉलेजमध्यें जाऊ नये. अभ्यास करू नये. कोणाशीं बोलू नये. जेऊ नये, खाऊ नये. "

तिचे डोळे पाण्यान सारखे भरून येत होते. गालावरचे अश्रु न पुसतांच एखाद्या पक्षिणीसारखी ती मला येऊन बिलगली. तिच्या त्या बोलण्यान आणि स्पर्शान माझा जीव आंतून जसा काहीं हलका हलका होत होता. तिच्या दुःखाची तीव्रता माझ्या अन्तःकरणापर्यंत जाऊन भिडत होती. तिच्या केसावरून नुसता हात फिरवीत राहिलो. मी कांहींच बोलत नाहीं अस पाहून ती पुन्हा हुदके देत म्हणाली, " रात्रीं झोप येत नाहीं चांगली. डोळे मिटले कीं तुमची मूर्ति दिसते डोळ्यासमोर तुम्ही बोलताहात अस वाटत तुमचा आवाज ऐकू येतो. तुमची पावल वाजत आहेत असा भास होतो सारखा. आणि अस वाटत कीं आत्ताच्या आत्ता उठून तुमच्याकडे याव. "

" वेडी आहेस. वेडी झाली आहेस तू माझ्यासाठीं, माझ्यावर किती प्रेम आहे तुझ ! पण एक लक्षांत ठेव, सगळ जग जरीं कोसळून पडल तरीं मी अतर देणार नाहीं तुला. या हातान दुसऱ्या मुलीचा हात पत्नी म्हणून कधी धरला जायचा नाहीं. या डोळ्यांनीं पत्नी या नात्यानं दुसऱ्या मुलीकडे कधीं पाह्यचा नाहीं मी. माझ सर्वस्व आतां तूंच आहेस. माझ्या संसाराची, माझ्या जीवनाची, माझ्या आयुष्याची आणि या

देहाची तूंच स्वामिनी आहेस. तुला दुःख होईल अशी गोष्ट माझ्या हातून कधीं होणार नाहीं. तुझा विश्वासघात करील असा शब्द आणि अशी कृती माझ्या कडून कधीं व्हायची नाहीं. माझी खात्री वाटते ना तुला ? ”

“ हो ! ”

“ लग्न मी केव्हाही करायला तयार आहें, माझे आई वडील माझ्या सुखाच्या आड कधींच येणार नाहींत. आणि आले तरी माझा मी समर्थ आहें. पण मी पुरुष आहें. तू स्त्री आहेस. मुलाचे सस्कार वेगळे असतात. मुलींचे वेगळे असतात. तुझे आई वडील आहेत. ते तुझ्या या लग्नाला समती देतील ? ’’

“ तें सागता येत नाहीं. मला वाटत त्याना याची फारशी कल्पनाच नसेल. पण ते संमती देवोत किंवा न देवोत मला तुमच्याशींच लग्न करायचं आहे. ”

“ आणि समज, त्यानी तुझ नाहींच ऐकल तर तू काय करशील ? ”

“ तर मी पळून येईन तुमच्या बरोबर. अन्य पुरुषाशीं लग्न करणार नाहीं. माझ लग्न त्यानीं दुसऱ्याच एखाद्या माणसाशीं लावून दिलं तर... तर मी जन्माची दुःखी होईन. मला जीव द्यावासा वाटेल. ”

तिच्या तोंडावर हात ठेवीत मी म्हणालो, “ अस काहीं बोलूं नकोस. मी माझ्या आईला सागतों. आणि पुढेही कसं करायच ह्याचा विचार करून ठेवतों. उद्या सकाळीं मला कॉलेजात भेट.”

माझी अवस्था सुमनहून काहीं निराळी झालेली नव्हती. प्रेमभग झाला तर माणसं जीव का देतात याची मला कल्पना येऊं लागलेली होती. ती सबध रात्र मी सुसगत आणि विसगत विचारात घालविली. डोळे मिटून स्वस्थ पडलो कीं वाटे सुमन जवळच बसली आहे. माझा हात तिच्या हातात आहे. माझ्या केसावरून ती हळूहळू हात फिरवीत आहे—

पण अशा या मनःस्थितींतही मी मनाचा एक निश्चय केला. सकाळीं कॉलेजांत गेल्यावर तिला काय सागायचं तें ठरवून टाकलं. काल लग्नाचं बोलणं आम्हा दोघांत झाल्यापासून एक प्रकारची जबाबदारी मला वाटूं लागली होती. सुमनच्या भवितव्याची सर्व जबाबदारी माझ्याच शिरावर

आहे अस कांहींस मला वाटू लागल होत. ती जवळ नसल्यान एकटेपणाच्या जाणीवेन तळमळत होतों. पहा एकटेपणा जाणवायला तरी दुकटेपणाचाच अनुभव आला होताना! आम्ही दोघ एक झालों होतों म्हणून तर अेकटेपणाची जाणिव अंत:करणाला पोळून काढीत होती. म्हणजे एकटेपणानं दुःखी होत होतों आणि तिकडे तर आता मी एकटा नाहीं, आम्ही दोघे आहोत या कल्पनेन सुखावून जात होतों, दुःखहि होत होत आणि सुखहि होतं. सुखदुःखाची संमिश्र भावना मनाला झोके देत होती. मी दुःखीहि नव्हतों आणि सुखीही नव्हतों. तरीपण मनाला कांहीं खुपत होत. आणि तरीसुद्धा मन सुखाचीं स्वप्न पहाण्यात दंग होऊन जात होतं. मन भारावल्या सारख झाल होत तर मनाची गति वाऱ्यापेक्षाहि चपळ झाल्याचा अनुभव येत होता. दोन विरोधी भावनाची एकदमच अनुभूति येत होती. हे सार कांहीं मला नवीन होत. काय होतय तें नेमक समजत नव्हतं. सृष्टी कांहीं निराळी दिसू लागली. जगातले व्यवहार रोजच्या-सारखे न वाटता ते काय चालले आहेत हे समजण्याची शक्तीच मुळीं क्षीण झाली होती. आपल्यासकट सारी पृथ्वी हलकी होऊन तरंगते आहे, ही चादणीरात्र रेशमाच्या धाग्यासारखी मऊ होऊन डोलते आहे आणि चोवीस तास स्वप्नाचा सडा पडतो आहे अस कांहींस चमत्कारिक मला वाटू लागल होत.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कॉलेजात गेलों तों आपल्या प्रियेचा शोध घेतच गेलों. ती घरातून बाहेर केव्हा पडते याची वाट मी आधीं किती तरी वेळ पाहिली होती. पण बाहेर पडताना मला ती दिसली नाहीं. तेव्हां माझ्या अगोदरच ती बाहेर पडली असावी अस म्हणून मी माझ्या तयारीला लागलों. कॉलेजात मी रोज जात होतों आणि जवळ जवळ रोज आमच्या भेटी होत होत्या. पण आज तिला भेटायला जाताना मला कांहीं निराळं वाटत होतं. विशेष वाटत होतं. माझा नेहमींचाच पोषाख व्यवस्थित, ठाकठीक असे. पण आज मी बाहेर पडताना दोन चार वेळां आरशांत पाहिलं. कोटाची कॉलर पुन्हा पुन्हां सारखी केली. माझाच चेहरा, पण मी कधीं न पाहिल्यासारखा पुन्हां पुन्हां आरशात पाहिला. एकदां समोरून पाहिला.

डाव्या बाजून, उजव्या बाजून पाहिला. आणि स्वतःशींच हसत, गुण-गुणत, थोडया खुषींत मी दाराबाहेर पाऊल टाकल. मन उल्हासान भरून गेल होत. सारी सृष्टिसुद्धा मला आनदान हसत असल्यासारखी वाटली. गाईच नुकत जन्मलेल गोजिरवाण वासरू जस हव्या तशा उडया मारीत जन्माला आल्याचा आनद उपभोगत तस माझ मन आज आनदात स्वैर विहार करीत होत. कारण माझी नीलिमा मला भेटणार होती. आणि आमच्या लग्नासबधींचा बेत मी तिला सागणार होतों. मनान एक-मेकांचे झालोच होतों. पण लौकीकात व्हायचे राहिलों होतों. आणि त्यासबधींच मी तिला काहीं सागणार होतो. तिच्याशिवाय या वेळीं मला काहीं सुचत नव्हत. तिची मूर्ति माझ्या डोळ्यासमोर नुसती नाचत होती. किती तरी वेळा मला रस्त्यात भास झाला कीं हीच ती. हीच नीलिमा हीच सुमन कवें. कारण रस्त्यातच ती कुठें भेटते का हे मी पहात होतो. पण तिची मूर्ति कुठें दिसली नाहीं. मीं मनांत म्हटल, प्रियकराला भेटायला स्त्री केवढी आतूर असते ! कॉलेज उघडायलाच आज गेली बहुधा नीलिमा.

पण कॉलेजात गेल्यावर मात्र अनुभव निराळाच आला. सबध कॉलेज मीं पालथ घातल. आमच्या सकेत स्थळीं मीं पुन्हा पुन्हा जाऊन पाहिल. पण त्याच त्या निर्जीव जागा तिथें होत्या. पण सुमन नव्हती. सुमन आज कॉलेजांत आलीच नव्हती. सगळे तास झाले तरी ती मला कुठें दिसली नाहीं. मी फार अस्वस्थ होऊन गेलों. काय करावं तें सम-जेना. कॉलेज सुटल्यावरहि कॉलेजच्या रस्त्यावरून दोन तीन फेऱ्या घातल्या. किती तरी वेळ रस्त्यावर उभा राहिलों. पण छे ! एवढया लोकात मला हव असलेल माणूस मात्र दिसल नाहीं. नको अस-लेले लोक विनाकारण भेटत होते. पण जिच्यासाठीं मी व्याकुळ झालों होतों ती सुमन मात्र मला भेटत नव्हती.

रस्त्यांतच किती वेळ फिरणार ? मग मी घरीं आलों. गॅलरींत उगीचच उभा राहिलों. पण घरांतून बाहेर पडताना कांहीं ती दिसली नाहीं. तिची

भावड दिसली. तिचे आईबाप दिसले. पण हव होत तें माणूस काही दिसल नाही.

त्या दिवशीं जेवणखाण काहीं सुचल नाहीं. एकाएकीं भारी उदास वाटू लागल. पुष्कळ विचार केला. पण निष्पन्न काहींच झाल नाहीं. यायचं कबूल करून यायच नाहीं अशी गोष्ट सुमनन आजपर्यंत कधीं केली नव्हती. ती का आली नाहीं यावर विचार करण्यात मीं किती तरी वेळ घालवला. शेवटीं संध्याकाळीं तिच्या छोट्या भावाला गाठून मी म्हणालो, “ सुमन कुठें गेली आहे ? ”

“ कोणत्या तरी गांवाला गेली आहे. ”

“ कोणत्या ? ”

“ तें मला माहीत नाहीं. ”

“ एकटीच गेली ? ”

“ नाहीं. माझ्या चुलत भावाच्या बरोबर ती गेली ”

“ परत कधीं येणार आहे ती ? ”

“ ते मला माहीत नाहीं. ”

“ पण कशासाठीं गावाला गेली आहे ती ? ” मीं चिडून त्याला विचारल.

हाताचे पंजे उडवीत तो म्हणाला, “ मला काय माहीत तिचें काय काम आहे तें ? ”

बातमी देणारा तिचा भाऊ निघून गेला. बातमी समजली होती. तरी अर्धवट होती. ती गावाला गेली आहे एवढच मला समजल. पण कुठें, कां, कशाला, परत कधीं येणार आहे याचा कांहींच उलगडा झाला नाहीं. माझ्या पायांतली शक्ति जणुं कोणी काढून नेत होतं. अस वाटल कीं ती कायमचीच निघून गेली आणि पुन्हां कधीं येणार नाहीं.

---

# ३

पण पुन्हा विचार केला कीं ती जिथें असेल तिथून पत्र पाठविल्या-शिवाय रहायची नाहीं. म्हणून मी रोज पोस्टमनची वाट पाहू लागलों. पोस्टमनची मार्गप्रतीक्षा करू लागलो. तो आला कीं मला वाटे हव असलेल पत्र तो देईल. पण इतर पत्र बेफिकिरीन खोलींत भिरकावून तो स्थितप्रज्ञ माणूस पुढच्या खोलीकडे वळे. त्याचा मला राग येई. सुमनच पत्र द्यायला तो विसरला नसेल कशावरून अशी शंका मला येई. वाटे कीं त्याच तें बाड त्याच्या काखेतून ओढून घ्याव आणि आपल हव तें पत्र काढून घ्याव. पण रोज नाहीं तीं पत्र येत होतीं आणि हव असलेल एक चिटोरसुद्धा येत नव्हत.

काय झाल असाव याची मला कल्पना येईना. आईला विचारून पाहिल. ती गांवाला गेली आहे या पलिकडे तिच्या माहितीची मजल गेली नव्हती. मी सहज म्हणून विचारल, " कधीं यायची आहे सुमन ? "

" काय कीं बाई. " म्हणून ती निघून गेली.

वाट पाहून पाहून पधरा दिवस गेले. महिना गेला. मग पत्राची आशा मी सोडून दिली. एक दिवस मी नावालाच पुस्तक घेऊन बसलों होतों. आई तादूळ निवडीत बसली होती. ती मला म्हणाली, " कळल का रे तुला ? "

" काय ? " मी उगीचच विचारायचं म्हणून विचारल.

" सुमनच लग्न ठरलं म्हणे. "

" कोण सुमन ? " मी जवळ जवळ ओरडलोंच.

" कोण म्हणजे काय ? अरे, सुमन कर्वे. आपल्या गांवच्या नानासाहेबांची मुलगी सुमन. तिचं लग्न ठरलं. "

" केव्हां ठरलं ? "

" केव्हां तें मला नाहीं माहीत. "

" मग मला म्हणाली नाहींस तें कुठें ? "

" तुला काय म्हणायच ? आणि मला तर आजच समजत आहे. "

" पण आहे केव्हा लग्न ? "

" परवा सध्याकाळीं."

" परवा ? आणि कुणाशीं ? "

" कुणाशीं तें मला माहीत नाहीं. "

आईच्या एकेक वाक्यान एकेक निष्ठूर आघात माझ्या अतःकरणावर होत होता. अस वाटल कीं आत्तांच्या आतां असच्या अस जाऊन तें लग्न मोडून टाकाव पण जाणार कुठें ? कसा जाणार ?

कुठें जायच हें मला माहीत नव्हत. तरी जागच्या जागीं स्वस्थ बसवेना. हातांतल पुस्तक रागारागान टेबलावर आपटल आणि बाहेर जायला निघालो. काय कराव सुचत नव्हत. सारख चालत रहाव आणि लांब लांब कुठे तरी जाव अस मात्र उत्कटतेन वाटत होत. जी बातमी मीं ऐकली होती तिचा अर्थ समजूनहि ध्यानात येत नव्हता. जी गोष्ट शक्य होण जरूर होत तीं अशक्य झाली होती, आणि खरोखरी परवाच्या दिवशीं घडणारी गोष्ट मला अशक्य आहे अस वाटत होतें. सुमनच लग्न, माझ्या नीलिमाच लग्न माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाशीं.......तिच्या निळ्या डोळ्यांत माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाच रूप.. ...तिचे हात माझ्या हातांत येण्याऐवजीं दुसऱ्या कोणाच्या.. छे छे! तिच नावसुद्धां दुसऱ्या कोणी तरी पति या नात्यान उच्चाराव ही गोष्ट मला इतकी भयकर, इतकी दुष्ट, इतकी दुर्दैवाची परिसीमा गाठणारी वाटत होती कीं माझी मलाच ही कल्पना सहन होईना. माणसाच्या आयुष्यांत अशा कांहीं अप्रिय गोष्टी घडतात कीं त्याचा उच्चार स्वतःजवळसुद्धां करू नये असं वाटत.

पण त्याच त्या नको असलेल्या गोष्टी माणसाच्या मनांत काहूर माजवतात ही केवढी दुर्दैवाची गोष्ट आहे! हें लग्न ठरल तरी कस ? या लग्नाला सुमनन समती दिली तरी कशी ? तुमच्याबरोबर पळून येईन म्हणून म्हणणारी नीलिमा तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणाची पत्नी होण्यापेक्षां मी जीव देईन म्हणणारी नीलिमा, आई वडिलांना

मी कोणत्याही प्रसगांत भिणार नाहीं म्हणून म्हणणारी, रात्रदिवस माझ्यासाठीं बेचैन होऊन उठणारी, माझ्या ध्यासान वेडी झालेली, माझ्याजवळ येण्यासाठीं आतुर झालेली आणि माझ्या विरहान व्याकूळ होऊन अश्रु ढाळणारी नीलिमा, एखाद्या निष्पाप मुलासारखी मळा बिलगून " मी तुमचीच आहे, मी तुमचीच आहे " अस म्हणणारी नीलिमा आणि ही लग्नाला तयार झालेली नीलिमा, या दोन व्यक्ती आहेत कीं एकच आहे ? मी रागावलेला नसे तरी माझ्या रागाची चिंता करणारी नीलिमा ...... आज माझ्या रागाची हिला काळजी नाहीं वाटली ! माझ्या प्रेमाची किंमत हिनं एवढी पाल्यापाचोळ्या सारखी केली ?

छे छे ! नीलिमा अस कधीं करणार नाहीं. अस करणाऱ्या मुली दुष्ट असतात. अस फसवणाऱ्या मुली इतक्या सुदर नसतात. असा विश्वासघात करणाऱ्या मुली एवढ्या स्वप्नाळु नसतात. प्रियकराला खोटी वचनं देणाऱ्या मुलींच्या डोळ्यात असा सात्विक नीलिमा नसतो. नीलिमाच्या स्पर्शांत केवढी उत्कटता होती ! माझ्याबद्दलची केवढी ओढ होती ! तिच्या व्याकूळ नजरेंत केवढी आर्तता, केवढी आर्जव होती ! मी लिहिलेल्या प्रेमपत्राचीं किती पारायण तिन केली होतीं ? तिन मला लिहिलेल्या प्रेमपत्रातून तिच्या प्रेमाची खात्री मला कितीवेळा पटली होती ?

पण मग हे झाल कस ? का झालं अस ? आणि माझ्यापासून तिनं इतक लपवून कां ठेवल ? मला पत्र पाठवून हें लग्न मोडायला तिनं मला का सांगितल नाहीं ? एवढी गोष्ट करायला मी काय असमर्थ होतों ? अस वाटलं कीं जाव आणि सर्वांच्या देखत तिचा हात धरून म्हणावं. " ही माझी आहे. माझ हिच्यावर प्रेम आहे. हीं पहा तिन मला लिहिलेलीं पत्र. तो मांडव, तें बोहलं, ते भटजी, ती वाजत्री, साऱ्या साऱ्याचा विध्वस करून म्हणावं कीं ही काय तुम्ही अशी गोष्ट दिवाबत्तीच्या झगझगाटात करीत आहांत? ज्याच्याशीं जिची तोंडओळख सुद्धां नाहीं त्याच्या हातांत तिचा हात देऊन तुम्ही काय तिच्या जन्माचा सत्यानाश करणार आहांत ? प्रसंगाची कटुता कमी करण्यासाठीं का तुम्ही ही वाजंत्री वडवीत आहांत ? तिच्या डोळ्यातले दुःखाश्रु दिसूं नयेत म्हणून कां तुम्ही हा मुंडावळ्यांचा खोटा

शृंगार तिला चढविला आहांत ? माझ्या प्रेमाची भूल पडावी, मला तिनं विसराव म्हणून कां तिला तुम्ही या भरजरी शालूनी आणि गाडाभर दागदागिन्यांनी नटवीत आहात ? तुम्ही मूर्ख आहात. तुम्ही सारे हृदयशून्य आहात. प्रेमाची किंमत तुम्हाला समजत नाहीं. दागदागिने, पंचपक्कान्न, हुंडा, मानपान, वाजंत्रीं, मिरवणुकी ह्याची लाच देऊन अतःकरणाच प्रेम विकत घेता येत अस वाटतय का तुम्हाला ? उभ्या जन्मात तुम्ही खर प्रेम कोणावर केल आहे कीं नाहीं ? मग का असे सैतानासारखे वागता ? का आमची ताटातूट करता ? का असे तिच्या आणि माझ्या अतःकरणाचे तुकडे करता ? कुणाच्या भावना पायाखालीं तुडवायला तुम्हाला भीति नाहीं वाटत ? शरमेन तुमच्या जीवाच पाणी नाहीं होत ? खुशाल तुम्ही लाडू, पोळया खातां. निर्लज्जपणान ढेकरा देता; लग्न तिच कां तुमच ? मग तिची अशी निष्ठूर थट्टा तुम्ही का करता ? अरे का करता बाबानो ही कसाब करणी ?

वाटल कीं खूप मोठ्यान ओरडाव. हमसून हुमसून रडाव, आणि एकदावं मरून जाव. चालून चालून दमून गेलों. चालण्यान शरीर आणि विचारान मन दोन्ही अगदीं थकून गेलीं. खूप उशीरा, चांगला बारा वाजून गेल्यावर घरीं आलों. आई काळजी करीत होती. जेवायची थांबली होती. पण माझी भूक मुळीं या घटनेन खाऊन टाकली होती. माझ्या डोळयासमोर नीलिमाची वरात दिसत होती. तिच्या आयुष्याचा मानकरी मी असा आकांत करीत रानावनातून भटकून आलों होतों, आणि तो कोण कुठचा चोर आज तिच्या जिवाचा धनी म्हणून मोटारींतून मिरवत होता. कशी मला तहानभूक लागावी ? तें अन्न मला कस गोड लागाव ? आईला मी म्हणालों, " मला भूक नाहीं. तूं जेवून घे. "

ती कांहींतरी म्हणाली. पण माझ तिकडे लक्ष नव्हत. लाथेनच वळकटी उघडून मी तिच्यावर आग टाकून दिल.

आणि मला भयंकर थकवा आला. मी कांहींतरी बडबडत होतों. कसलीं तरी स्वप्न पहात होतों. कांहींतरी भयंकर आवाज ऐकत होतों. मी आज अगदी एकटाच कसा अस कांहीं तरी मला वाटत होतें. मला असह

आवरेनात. मोठा झाल्यावर मी असा कधीं रडलों नव्हतो. पुरुषाच्या डोळ्यांतून असं सहजासहजीं पाणी येत नाहीं. पण झालेली जखम माझ्या जिव्हारीं लागली होती. अश्रु गाळतां गाळतांच मी केव्हां तरी झोंपी गेलों.

सकाळ झाल्यावर मात्र मन थोड शान्त झाल. शान्त करण्याचा मुद्दाम प्रयत्न करू लागलों. नीलिमाबद्दल मला खात्री होती. तिच्या प्रेमाची मला जरासुद्धां शका नव्हती. सर्व गोष्टी तिच्या शक्तीच्या हद्दीबाहेर गेल्या असल्याशिवाय ती एवढी आगतिक नाहीं होणार. तिनं मला वचनं दिलीं होतीं. पण तिचा निरुपाय झाला असला तर ती बिचारी काय करील ? तिला कोणाची मदत मिळाली नसेल. कोणाचा आधार नसला तर मुलीची जात करणार तरी काय ? त्याच्या नशिबीं मग हें अस बळजबरीच जिणं येतं. नको असलेला ससार माथीं घ्यावा लागतो.

छे छे ! मनांतल्या मनात ती माझा धावा करीत असेल. काहीं तरी घडाव आणि मी तिला घेऊन जाव अशी ती परमेश्वराची प्रार्थना करीत असेल. मला गेलच पाहिजे. ती कुठ गेली आहे, कोणाबरोबर तिच लग्न ठरल आहे याचा शोध मला केलाच पाहिजे. इतके दिवस मी स्वस्थ बसलों हा माझाच मूर्खपणा झाला. अजून वेळ गेली नाहीं. उद्यां सध्या-काळीं लग्न आहे. कर्वे मडळींनीं कुणाला सांगितल नसल म्हणून काय झालं ? इतर अनेक लोकांना, गांवांत ही बातमी असलीच पाहिजे. मी निश्चय केला आणि ठरवल कीं सगळी बातमी काढून तिथें जायच आणि तो बळजबरीच्या लग्नाचा मांडव मोडून टाकायचा.

उठलों आणि बाहेर जायला निघालों. माझे दोनतीन मित्र आणि इतर चार माणसं यांच्याजवळ चौकशी केली, तेव्हां थोडयाच अवधींत समजल कीं साताऱ्याला आपट्यांच्या मुलाचा विवाह सुमन कर्वे हिच्याशीं उद्यां संध्याकाळीं होणार आहे. छापलेली पत्रिकाच मला मिळाली.

त्याच दिवशीं माझ्या एका मित्राला घेऊन मी साताऱ्या मोटारींत बसलों. माझा मलाच विशाद वाटला. माझ्याच लग्नाची धावपळ करण्या-ऐवजीं लग्नाचा विध्वंस करण्यासाठीं मला माझ्या जीवाचा एवढा आटा-पिटा करावा लागत होता. आंतून नुसता अस्वस्थ होऊन गेलों होतों.

मोटारींतला तो वेळ सपता सपत नव्हता. मोटारीचा वेग अगदीं मद आहे आणि किती वेळ झाला तरी सातारपासून आम्ही अगदीं फार दूर आहोत अस सारख वाटत होत. दर दहा मिनिटाला घड्याळांत किती वाजले तें पहात होतों. मोटारचा स्टॉप आला कीं मनाशीं चडफडत होतों. ड्राय-व्हरवर रागावत होतों अस वाटल कीं मोटारच चाक आपल्या हातांत घ्याव आणि अर्ध्या तासात गाडी साताऱ्यांत नेऊन उभी करावी.

पण गाडी जेव्हा जायची तेव्हांच ती साताऱ्यांत गेली. मला फार चमत्कारिक वाटू लागल. कोटाच्या खिशांत ठेवलेलीं सुमनचीं पत्रं मी वारवार चाचपून पहात होतों. तिथें गेल्यावर काय बोलायच, कसं वागा-यच याची मनांतल्या मनात पुन्हां पुन्हां उजळणी करीत होतों. आम्ही सातारला पोंचलों तेव्हां रात्रीचे आठ वाजून गेले होते. आत्तांच्या आतां जाऊन कर्वे मडळींना समज द्यावी असा माझा आग्रह होता. पण माझ्या मित्रान मला चुचकारीत म्हटल "आतांच प्रवासांतन आलों आपण. आपल्या मनाची अस्वस्थता गेली नाहीं अजून. मन थोडं शांत होऊं दे. आपण मवाली कां आहोत ? चार सभ्य माणसासारखच आपल्याला वागलं पाहिजे. उद्यां सकाळीं जाऊ सुमनला भेटू ती काय म्हणते तें ऐकूं."

"वेडा आहेस तूं." मी उसळून म्हणालों. "सुमन आपल्याला सहजासहजीं भेटेल अस कां वाटतय तुला ? सात पहाऱ्यात आणि सतरा गोषांत ती दडवलेली असणार"

"असू दे. कुठेंहि असूं दे. आपण तिला आपल्या समोर यायला लावू. पण आतां नको प्रभाकर. माझ ऐक तू. उद्यां सकाळीं जाऊं. आतां आपण जेऊन झोप काढू या. तू रात्रभर शांत मनान विचार कर. माझा आशिर्वाद आहे तुला. उद्यां सध्याकाळच्या मुहुर्तावर सुमनचं लग्न पुरुषोत्तम आपटेशीं न लागतां प्रभाकर वर्तकशीं लागेल. पण जरा धीरानं घे. वाटल तर तूं जा एकटा. पण मी नाहीं येणार."

मग माझा नाईलाज झाला पण मी एकटाच जायला तयार नव्हतों. माझ्याबरोबर मला माझा असा एक तरी माणूस हवा होता.

ती रात्र मीं कशी काढली ती माझी मला माहीत. सकाळ उजाडतांच कर्व्यांचा जानोस कुठें आहे याचा तपास काढीत निघालों. घर सापडायला फारसा वेळ लागला नाहीं. दारांत केळी बांधलेल्या होत्या. आणि अंगणांत मांडव उभारलेला होता. चौघडा वाजत होता. तें दृश्य मला अगदीं असह्य झालं. पण हजार अंक मोजित आम्ही आंत गेलों. कर्वे, सुमनचे वडील ओटीवरच बसलेले होते. आणखीहि चार मडळी तिथें बसलेली होती. त्यांचीं कांहीं लग्नाचीं बोलणीं चाललीं होतीं. मला पहातांच कर्वे एकाएकीं चमकून उठले. पण पहाता पहाता त्यांनीं आपला चेहरा अनोळखी केला. आणि मला म्हणाले, " कोण तुम्ही ? तुम्हाला कोण पाहिजे ? "

" मी प्रभाकर वर्तक. तुमच्याशींच माझं काम आहे "

" माझ्याशीं ? तें काय बुवा ? पण तुमची माझी तर ओळखसुद्धां नाहीं. नावसुद्धा ऐकल्यासारखं वाटत नाहीं कुठें ! "

" खोट बोलता तुम्ही. " मी उसळून म्हणालों. " तुमची माझी ओळख आहे आणि मी कुठें रहातो हेंहि तुम्हाला चांगलं माहीत आहे. "

" तुमच्याच वाड्यांत, तुमच्या समोरच रहात नाहींत का हे ? " माझा मित्र मध्येंच सौम्यपणान म्हणाला.

" असेल, असेल. पण पुढें काय ? तुमच इथें काय काम आहे ? वाड्यांतल्या लोकांकडे लक्ष द्यायला मला फुरसद नाहीं. असे पुष्कळ लोक रहातात वाड्यांत. "

" पुष्कळ रहात असतील. पण मी तुमच्या चांगल्या परिचयाचा आहे. तुमच्या मुलीची अन् माझी चांगली ओळख आहे. तिचं आज संध्याकाळीं लग्न आहे असं समजलं म्हणून आलों मी. "

" मग या ना. लग्नाला जरूर या. पण लग्न संध्याकाळीं आहे. आत्तां नाहीं. मग जाऊं मी आतां ? मला पुष्कळ कामं आहेत. "

" तुम्ही काय थट्टा करतां काय माझी ! मी कां आलों याची कल्पना आहे तुम्हाला. उगीच वेड पांघरूं नका. तुमच्या मुलीचं हें लग्न मी होऊं देणार नाहीं. हें लग्न तुम्ही तिच्या मनाविरुद्ध करीत आहांत. "

" अहो, काय बोलताहात काय तुम्ही ! तुम्ही शुद्धीवर आहांत का ! तुमचा आमचा सबंध काय ! मी माझ्या मुलीचं लग्न कसंहि ठरवीन. तुम्हांला का त्याची पचाईत ! "

" कारण तिच्यावर माझ प्रेम आहे. आम्ही एकमेकांना मनान वरलेलं आहे. तिच्या आणि माझ्या लग्नाच्या आणाभाका झालेल्या आहेत. तिचं लग्न माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाशींहि होण अशक्य आहे. तिची या लग्नाला समती असणं कधींहि शक्य नाहीं. "

" शक्य नाहीं कस ! तिच हें लग्न तिच्या मनाप्रमाणें आणि खुशीनंच ठरलेल आहे. "

" मग या पत्राचा अर्थ काय ! हीं पत्र पहा एकदां वाचून. म्हणजे मी म्हणतो तें खर कीं खोटं याची खात्री पटेल तुम्हाला. " अस म्हणून मीं पत्राच पुडकं त्याच्या अगावर भिरकावून दिल.

म्हाताऱ्यान तें शांतपणान खिशांत ठेवून दिल आणि म्हणाला, " तुम्ही जा आता. मी मागून वाचीन हीं. तुमचं डोकं फिरलेळ दिसतय. माझ्या मुलीच्या लग्नाची काळजी तुम्ही करूं नका "

" तुम्ही माझ्या म्हणण्याचा विचार करीत नाहीं तर ! "

" नाहीं "

" मग सध्याकाळीं येऊन हें लग्न मी मोडून टाकीन. आत्तांच्या आत्तां जाऊन आम्ही आपट्यांच्या मंडळींना सांगतों कीं या मुलीशीं तुम्ही लग्न करू नका. हिचं माझ्यावर प्रेम आहे. हिनं मला तशीं वचनं दिलेलीं आहेत. हजारों वेळा आम्ही एकमेकांच्या गांठीभेटी घेतलेल्या आहेत. आणि हिनं मला शेकडों प्रेमपत्रं लिहिलेलीं आहेत. "

" कुठें आहेत तीं पत्रं ! " म्हाताऱ्यानं माझ्यावर डोळे रोखीत धूर्तपणानं विचारलं.

" मग तुमच्याजवळ दिलीं तीं काय आहेत ! "

" माझ्याजवळ कांहीं नाहीं. तुमच्याजवळ पत्रं कुठें आहेत तीं मला दाखवा. "

" असं होय ! पण पत्राशिवाय मी हें लग्न मोडूं शकेन, याची कल्पना आहे का तुम्हांला ? माझ्याजवळ आणखी पुरावे आहेत. "

" मग दाखवा ना कुठें आहेत ते ? "

" तें दाखवण्याचं कारण नाहीं तुम्हांला. ज्याना दाखवणं जरूर आहे त्या आपटे मंडळींनाच मी नेऊन दाखवीन. "

माझ्या मित्रानं मला साथ दिली. तो म्हणाला, " आम्हांला काय सांगायचं तें आम्ही आपटे मंडळींनाच सांगू. पण तुम्ही सुमनला बाहेर बोलवा. "

" हो. " मी म्हणालों. " तिला मला विचारायचं आहे कीं, हें लग्न तुझ्या संमतीनं होत आहे का ? "

" पण मी सांगतो ना, आमच्या घरातल्या मुली आईबापापेक्षां निराळीं मतं ठेवीत नसतात. तिला काय विचारायचं तें मलाच विचारा. तिच्याशीं तुम्हांला काय करायचं आहे ? "

मी म्हणालों, " तुमच्यावर माझा विश्वास नाहीं. तिला बाहेर बोलवा. नाहींतर मी असा आपट्यांच्याकडे जातों. "

म्हाताऱ्यानं जरा वेळ विचार केला. आम्हाला शक्यतों सामोपचारानं परत पाठवणं त्याच्या हिताचं होतं. तो म्हणाला, " ठीक आहे. मी बोलावतों तिला. बसा तुम्ही. "

म्हातारा आंत गेला. मी जागच्या जागीं अस्वस्थ होऊन बसलो होतों. नाना तऱ्हेचे विचार डोळ्यात घोळत होते. निराशेनं जसं काहीं मला घेरून टाकलं होतं. तरीपण सुमनवर माझा विश्वास होता. सुमनचं माझ्यावर प्रेम होतं. तिच्या प्रेमाची मला खात्री होती. ती काय सांगेल यावर सारं भवितव्य अवलंबून होतं. तिच्या हातीं माझ्या भवितव्याची जबाबदारी मीं सोपवली होती. पण तिचा मला विश्वास होता. ती काय सांगेल, तिला काय वाटत असेल याची माझ्याइतकी खात्री, माझ्याइतकी कल्पना दुसऱ्या कोणाला असूं शकणार ? तेवढ्या त्या वेळांत मागल्या अनेक भेटींची मला आठवण झाली. तिच्या गोड वचनांतील वाक्य मला पुन्हां पुन्हां ऐकूं येऊं लागलीं. वेळोवेळीं तिच्या डोळ्यांत जमा होणारे अश्रू,

तो आतुर, उत्सुक चेहरा मला दिसू लागला. " मी तुमचीच आहे, मी तुमचीच आहे." हे तिनं काढलेले व्याकुळ उद्गार मला ऐकूं येऊ लागले आणि अस वाटल कीं सुमनचं लग्न माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाशीं होणं कस शक्य आहे ? सुमन येईल आणि सांगेल. मला पहातांच तिला धीर येईल. मला पहातांच आपल्या बापान उभारलेल हें लग्नाच नाटक मोडून टाकून ती माझा हात धरून चालू लागेल. मी तिची वाट पहात होतों, तिच्या बाहेर येण्याची वाट पहात होतों. पण कितीवेळ झाला तरी हा किराणा मालाचा व्यापारी बाहेर येईना कीं मुलीलाहि बाहेर पाठवीना. तेव्हा माझा मित्र ओरडून म्हणाला, " कर्वे साहेब, बाहेर या. सुमनला बाहेर बोलवा "

मीहि ओरडून म्हणालों, " लौकर या बाहेर. आम्हांला का एवढं तिष्ठत ठेवल आहे ? थापा मारता कीं काय ? सुमनला घेऊन बाहेर या नाहींतर आम्ही आत येऊ आणि आपल्याच्याकडे जाऊन सार सांगून टाकू. "

तेव्हा म्हातारा बाहेर आला. बरोबर सुमनहि आली होती. सुमन नुसती खालीं बघत होती. तिन माझ्याकडे बघितलच नाहीं. एक दोन मिनिटं नुसत्या स्तब्धतेत गेलीं. ती शांतता असह्य होऊन मी म्हणालों, " हें लग्न तुझ्या समतीनं ठरल आहे ? "

" होय. "

" मग मला तू जीं पत्र लिहिलींस त्याचा अर्थ काय ? "

" तुम्हाला मीं कधींच पत्रं लिहिलीं नव्हतीं. "

" तू पत्र लिहिलीं नाहींस मला ? आणि महिन्यापूर्वीच आपण लग्नाची शपथ घेतली त्याची बाट काय ? त्याची आहे का आठवण ? "

" तुमचा काहींतरी गैरसमज झालेला दिसतो आहे. तुमची माझी ओळख सुद्धा नाहीं, मग तुम्हाला मी लग्नाचं वचन कसं देईन ? तुम्हाला मी पत्रं कधीं लिहीन ? माझं हें लग्न, माझ्याच संमतीनं आणि माझ्याच इच्छे-प्रमाणें ठरलेलं आहे. तुम्ही उगीच त्रास करून घेत आहात. "

एवढंच ती म्हणाली आणि आलेला हुदका आंतल्या आंत कोंडून धरीत ती धावतच आंत निघून गेली.

माझ्या डोक्यावर वज्राघात झाला. शेत कुपणानच खाऊन टाकल. सुमन कर्वे या सुंदर मुलीन माझा असा केसान गळा कापला. लग्नाची गळ तिनं मला घातली नाहीं. मला तिन प्रेमपत्र कधीं लिहिलीं नाहींत. माझ्या बाहुपाशांत बेहोश होऊन या कारटीन कधीं आपले हात माझ्या गळ्यांत घातले नाहींत. एवढच काय पण तिची माझी ओळखसुद्धां नाहीं. फुलांच्या नांवानं जगांत मिरवून या पोरट्या दगडाच्या अंतःकरणान वागू शकतात ही घटना प्रामाणिक माणसाला वेड करायला खास पुरेशी होती.

माझं डोक अगदीं बधीर होऊन गेल. दृष्टीसमोर अधाराचा अथांग सागर उसळून उठला. काय झाल आहे, काय चालल आहे, काय होणार आहे हें समजण्याची शक्तीच संपून गेली. खर काय, खोट काय तेंच समजेना. डोकं अगदीं दाबून, घट्ट धरून बसलों.

सुमनन दिलेला स्कार्फ गळ्याला गुंडाळलेला होता. ती येण्यापूर्वी त्याच स्कार्फला मी पुन्हां पुन्हां स्पर्श करीत होतों. तो स्कार्फ मला फुलांच्या हारासारखा वाटत होता. आतां तोच मला सर्पाच्या वेटोळ्या-सारखा वाटूं लागला. तो स्कार्फ काढून मी जमिनीवर जोरांत आपटला.

म्हातारा म्हणाला, " घरीं जा आतां. तुमच डोकं फिरलेलं दिसतं आहे. "

त्यानं असं म्हणतांच माझं डोकं खरंच फिरून गेलं. म्हाताऱ्याला, सुमनला, साऱ्या घरादाराला शिव्या देत मी आरडाओरडा करू लागलों. अधिक शोभा नको म्हणून माझ्या मित्रानं मला कसा बसा घरीं आणला.

घरीं येईपर्यंत मी तापानं फणफणून निघालों होतों. त्याच दिवशीं आम्ही परत पुण्याला आलों, आलों आणि त्याच दिवशीं अंथरुणावर पडलों. सुमननं केलेला विश्वासघात, मला आलेलं अपयश, तिथं झालेली मानहानी आणि दोन दिवस झालेला भयंकर मनःस्ताप............

मधले पंधरा दिवस कसे गेले ते मला समजलेच नाहींत. पंधरा दिव-सांनी मी शुद्धीवर आलों. पंधरा दिवस मी मुळीं या जगांत नव्हतोंच.

माझ्या अस्तित्वाची मलाच जाणीव नव्हती. मी जेव्हां शुद्धीवर आलों तेव्हां माझी आई मला म्हातारी झाल्यासारखी वाटली. माझा हात मी सहज म्हणून उचलला. तो तेवढ्यांतच मी अगदीं थकून गेलों. मी विचार करूं लागलों. काय झाल होत मला ? मी कशानं आजारी पडलों होतों ? मला कोणाचं औषध आहे ? इतके दिवस मी होतों तरी कुठें ? आणि नीलिमा ? तिचं लग्न ? तिचा तो नवरा ? ती आतां कुठें असेल ?

पुन्हां मन भरकटू लागल आजारपणांत झोपेशिवायचा सगळा वेळ माझा हेच विचार करण्यांत जाऊं लागला. जागा झालों कीं डोळ्यासमोर तो साताराचा प्रसग उभा राही. ती मानहानी, तो सुमनचा बाप, सुमनचें तें धडधडीत खोट, बेमुर्वतखोर उत्तर, तिचासुद्धां तो अनोळखी चेहरा आणि मलाच खोट पाडण्याची तिची ती शहामत हें मला पुन्हा चित्रासारखं दिसे. तो प्रसग आता पुन्हां घडत असल्याचा मला भास होई. हा प्रसग घडण्यापूर्वी सुमनच्या व माझ्या भेटीच्या आठवणी अशा किती तरी होत्या की ज्यान मी कष्टी झालों नसतों. पण इथून पुढें माझ्या मनाची अशी कांहीं अवस्था होऊन गेली होती कीं मला त्या आठवणींची सुखदायक स्मृती होईचना. आणि हा नको असलेला साताराचाच प्रसंग सारखा डोळ्यापुढें उभा राही. राहून राहून मला वाटे कीं हें कसं झाल ? असं झाल तरी कस हें ? सुमन एवढ खोट कशी बोलली ? मला पाहूनसुद्धां तिच्यावर काहींच कसा परिणाम झाला नाहीं ?

पण असे सतराशें प्रश्न करूनहि कांहीं उपयोग नव्हता. ती प्रत्यक्ष समोर येऊन कांहीं बोलली असती तर माझ्या प्रश्नांना उत्तरं मिळालीं असतीं. पण तिनं तर मला न भेटतांच एक जन्माची महत्वाची गोष्ट अगदीं घाईनं उरकून घेतली होती. आतां त्यांत बदल होण्यासारखा नव्हता. आम्ही ठरवल्याप्रमाणें जर सर्व कांहीं झालं असतं तर तिच्यांत आणि माझ्यांत अंतर या शब्दाचा अर्थ कधीं करावा लागला नसता. ती आणि मी अशीं दोघ एकत्र झालों असतों. तिच्या आणि माझ्या जीवनाचा प्रवाह वहात राहिला असता. तिच्या आणि माझ्या भवितव्याची रेषा भिन्न होऊन राहिली नसती. पण झालं तें अगदीं उलटच. आतां

तिच्यांत आणि माझ्यात दूरत्वाची एक प्रचड दरीच पसरली. आतां ती कोण आणि मी कोण ! तिच माझ नात काय ! तिच नाव गाव सार काहीं आता माझ्यापासून अगदीं वेगळ, निराळ झालं होत. हें सगळ घडण्यापूर्वीं तिची जाणीव माझ्या अतःकरणाला अभिन्नत्वान होत होती. आतां तिची ओळख मला भिन्नत्वानच ठेवण भाग होत जें तिच आहे तें माझ नाहीं आणि जें माझ आहे तें तिच नाहीं. एक लग्न झाल आणि सुमनच जग माझ्याहून निराळ होऊन गेल. यापूर्वीं मी तिला नेहमीं म्हणत होतो कीं आपल्या दोघाचच जग आहे. त्यांत तिसऱ्या माणसाला जागा नाहीं. पण आता मीच तिच्या जगांत परका होऊन बसलो. छे ! हें दुर्दैव भयकर होत. या परकेपणाच्या यातना असह्य होत्या. लग्नाला तयार होण्यापूर्वीं, तयार झाल्यावरसुद्धा कां होईना, पण तिन मला भेटायला हव होत अस मला राहून राहून वाटत होत. आतां मात्र त्याचा काहीं उपयोग नव्हता.

पण माणस केवढया घोडचुका करतात ! जेव्हांची गोष्ट तेव्हा करीत नाहींत, आणि भलत्याच वेळीं त्या करायला जातात. नको त्या वेळीं त्यांची हालचाल सुरू होते. आजारपणातून मी नुकताच बरा झालों होतों. घरांतल्या घरांत हिंडू फिरूं लागलों होतों. मनाला काहीं समजावीत होतो. प्रेमभगाचं दु.ख म्हणजे अवघड जागीच दुखणं. कोणाला सागतां येत नाहीं. कोणाजवळ मन उघड करता येत नाहीं. तोंड दाबून बुक्याचा मार झाला होता. मनात मात्र सारखे तेच तेच विचार येत. त्यामुळें घरातल्या मडळींच्याकडे माझ लक्षच नसे. माझ्या विचारात मी चूर असें. तरी पण दुःखाची तीव्र झळाळी, शोकाचा तो आवेग ओसरल्यासारखा झाला होता आणि मनाला एक प्रकारचा उदास भकासपणा आला होता. देहाला, मनाला निष्क्रीयतेचा अनुभव येत होता. चडफडाट कमी होऊन खिन्नता भरून राहिली होती. कांहीं करूं नये, नुसतं पडून रहाव असं वाटे. तासन् तास मी आढयाकडे पहात पडून असायचा. जणुं माझ्या मनांत एक निराळी सृष्टि मीं निर्माण केली होती आणि या जगाशीं माझा कांहीं संबंध नव्हता.

पण अशा या असमाधानी मनाच्या व्यापारांतहि कांहीं एक व्यवस्था असे. काहीं सुसगतता असे. पण एकेक दिवस फार चमत्कारिक उगवे. दिवस रात्र बेचैन होऊन राही. काहीं कारण नसताना गळयाशीं दाटून येई. काहींहि नवीन घडलेल नसताना डोळ्यात पाणी उभ राही.

पण त्या दिवशीं कारण घडल. सुमन मगळागौरीसाठीं माहेरी आली होती. पुष्कळ मुली जमल्या होत्या. चौरगाला केळी बाधून पूजा करीत होत्या. सुमनला मी एकदाच पाहिली. ती शालू नेसली होती. हातांत हिरव्या बागड्या होत्या बरेचसे दागिने घातले होते. आणि पूजेच तबक घेऊन ती आपल्या घरातून दुसऱ्याच्या घरांत गेली. मोठ्या लगबगीनं गेली. मी वरून पहात असेन याची तिला बहुधा आठवण झाली नसावी. नाहीं तर तिन वर पाहिल असत. माझ्याकडे पहाण्याची तिला इच्छा झाली असती. पण तिन वर पाहिल नाहीं. कदाचित् तिच्यावर निराळा परिणाम झाला असेल. अपराधी मनाला निरपराधी माणसाकडे पहाण्याची भीति वाटते. शरम वाटते. आपल्या कृत्याच्या जाणिवेन सुमननं माझ्याकडे पहायच टाकल असावं.

पण मी तिला पाहिली आणि हजारों प्रश्न माझ्या मनात गर्दी करून उठले. कुणासाठीं मगळागौरीची पूजा करणार सुमन ? कोणासाठीं सौभाग्याच दान मागणार ती आज ? तिच्या नवऱ्यावर तिच एवढं प्रेम बसलं असेल ? तिची आणि त्याची ओळख ? तिची आणि त्याची गाठभेट?...

पुढचे विचार मला करवेनात. छातींत कांहीं तरी होऊ लागलं. तुटल्यासारख वाटू लागल. मनात अस्वस्थतेचा मोठा गोंधळ माजून राहिला. त्याच मन:स्थितींत कितीवेळ गेला याचा मला पत्ता लागला नाहीं. मी माझ्या मन:स्थितींतून वर आलों त्याला एक अनपेक्षित कारण घडलं. मला नको असलेल कारण घडल. तें आधीच व्हायला पाहिजे होतं आणि मागून तें घडण्याचा कांहीं उपयोग नव्हता असं जें मला वाटत होतं तेंच नेमकं आतां घडलं.

सुमन माझ्या खोलीच्या दारांत येऊन उभी होती. तिला पाहून मला काय वाटलं हें मला आज सांगतां यायचं नाहीं. तेव्हां सुद्धां सांगतां आलं.

नसतं. शब्दांच्या शक्तीपलिकडे त्या भावनेची अनुभूति होती. मी नुसतं म्हणालों, " ये ना आंत. "

ती एखाद्या आज्ञाधारक मुलासारखी आंत आली. मी बसलों होतों त्याच्या समोरच दुसरी एक खुर्ची होती. पूर्वी सुमन आली म्हणजे या खुर्चीवर हक्कानं येऊन बसत असे. एवढंच काय पण माझ्या खुर्चीच्या हातावर बसून ती किती तरी वेळां माझ्याशीं बोलली आहे. पण आज ती नुसतीच उभी राहिली. मी म्हणालों " कां आलीस ? "

" थोडं काम होतं तुमच्याकडे. " ती खालीं पहातच म्हणाली. अजून तिनं माझ्याकडे पाहिलं नव्हतं.

" माझ्याकडे काम होतं तुझं ? तुझा माझा संबंध ? "

" रागाऊ नका ना. मी पाया पडतें तुमच्या " असं म्हणून सुमननं खरोखरीच माझ्या पायांना स्पर्श केला. पाय एकदम मागें घेऊन मी म्हणालों, " तुझा कांहीं तरी भयंकर गैरसमज झालेला दिसतो आहे. तूं समजतेस तो माणूस मी नव्हे. तू कां आलीस इथें ? "

" तुम्ही असं कां बोलता आहांत तें समजत आहे मला. तुमचा त्यांत मुळींच दोष नाहीं. पण माझं ऐकून घेणार आहांत का ? तुम्ही सातारला आलात त्यावेळीं जें घडलं, त्यावेळीं मी जें बोललें, त्याचं कारण सांगून तुमची क्षमा मागायला मी आलें आहें. "

" तें कारण तूं आधीं सांगायला हवं होतंस सुमन. आतां तें कारण कळून न कळून, माझ्या दृष्टीनं सारखंच आहे. तुझी कारण परंपरा तूं आतां कितीहि लांब करून सांगितलीस तरी आहे या परिस्थितींत आतां फरक पडणार आहे का ? "

" फरक कसा पडणार ? "

" होय ना ? मग मला काय करायचं आहे तें सारं भारुड समजून ? "

" तुमच्या दृष्टीनं त्यांत अर्थ नसला तरी माझ्या मनाचं समाधान होण्यासाठीं तरी मला तुम्हाला सारं सांगितलं पाहिजे. "

" पण तुझ्या समाधानाचा विचार मीं केलाच पाहिजे असं कांहीं नाहीं नाहीं तुझं माझं. "

" खर आहे तुम्ही म्हणतां तें. पण मी एक भिक्षा मागतें तुमच्या जवळ. माझं ऐकून घ्या. माझं म्हणण एकदांच ऐकून घ्या. मग तुमच्या दृष्टीला मी कधीं पडणार नाहीं तुमच्या आयुष्यांत येऊन मीं तुमचा सत्यानाश केला. आतां पुन्हां नाहीं तुम्हाला त्रास देणार. पण माझं ऐकून घ्या. घेणार का ऐकून प्रभाकर ? "

' प्रभाकर ' म्हणून तिन मला हांक मारली. अगदीं तोच स्वर. तोच आवाज. तीच त्या स्वरांतून पाझरत माझ्या अंतःकरणापर्यंत येऊन पोंचणारी आर्तता. क्षणभर मी मधल सार विसरून गेलों. मी कांहींच बोललो नाहीं; पण परिस्थितीन निर्माण केलेल अंतर मी विसरलों नाहीं. मनाला आवर घातला. म्हणालों " सांग. तुला काय सांगायचं आहे तें सांग. मी नुसत ऐकेन. कांहीं बोलणार नाहीं. कारण तुझ्याबाबत माझं मत आधींच ठरून गेलं आहे. वाटलं तर त्याचा उच्चार शेवटी करीन. पण मधें कांहीं बोलणार नाहीं. मी ऐकतों आहें. तू बोल. एक विनती करू कां तुला ? " ती समोरच्या खुर्चीवर बसत होती म्हणून मी म्हणालों—

" काय ? "

" या खुर्चीवर तू बसू नकोस सुमन. "

" कां ? "

" मूर्ख आहेस तूं. याचं कारण तुला समजत नसलं तर दुर्दैव माझं. मी सांगणार नाहीं. या खुर्चीवर एक निराळीच मुलगी बसून गेलेली होती. ती तूं नव्हेस. आणि तुझ्याकडे आज पहाणारा तो पूर्वीचा प्रभाकरहि हा नव्हे. या, शेजारच्या, दुसऱ्या खुर्चीवर बैस. " .

थरथरत्या अंगानं सुमन दुसऱ्या खुर्चीवर जाऊन बसली. मनांतल्या मनांत ती वाक्यांची जुळवाजुळव करीत होती. मजकूर जमवीत होती. तिच्या मनाचा गोंधळ उडाला होता. थोडा वेळ तिला कांहीं सुचत नव्हतं. तशीच बसून राहिली होती. खालीं बघत होती. अखेर मीच म्हणालों, " सांग ना. "

सुमन म्हणाली " रागावूं नका. "

" थांब. आणखी एक विनंति आहे तुला माझी. वाक्यागणीक रागावूं नका. या मंत्राचा जप करूं नकोस. माझ्या रागालोभाची पर्वा करण्याचं तुला कारण उरलेलं नाहीं. तुझं म्हणणं ऐकून घेण्याचं वचन मी तुला दिलं आहे. तें मी मोडणार नाहीं. दिलेलं वचन मोडण्याची मला सवय नाहीं. सांग तुझं म्हणणं. "

" तुम्ही माझी त्या दिवशीं कॉलेजांत खूप वाट पाहिली असाल. पण मी येऊं शकलें नाहीं; त्याला माझा इलाज नव्हता. आदल्या दिवसा-पासून आमच्या घरांत गोंधळ माजला होता. तुम्हीं लिहिलेलीं पत्रं कशीं कोण जाणे पण माझ्या आईवडिलांच्या ताब्यांत गेलीं. रात्रींच त्यांचा मला जाब विचारला. मीं त्यांना निक्षून सांगितलं होतं कीं मला तुम-च्याशींच लग्न करायचं आहे. पण त्याचा कांहींमात्र उपयोग झाला नाहीं. उलट त्यांनींच मला धमक्या दिल्या कीं, तूं प्रभाकरबरोबर गेलीस, त्याला भेटलीस तर आम्ही त्याला बदडून काढूं. त्याला पोलीसच्या ताब्यांत देऊं. आम्हांला हे चाळे खपायचे नाहींत. अमुक आणि तमुक ते मला किती बोलले आणि मीं तें सहन कसं केलं तें माझं मला माहीत. मीं तुमच्यावर प्रेम केलं, पत्रं लिहिलीं परस्पर लग्न जमवलं याच गोष्टी त्यांना पसंत नव्हत्या.

" आई म्हणाली, विषाची परीक्षा नको. हिला उद्यां सकाळच्या गाडीनं सोलापूरला पाठवून द्या. आजपासून कॉलेज बंद. दुसऱ्या दिवशीं सकाळीं माझी सोलापूरला काकांच्याकडे रवानगी झाली. तुम्ही उठण्या-पूर्वींच मी स्टेशनवर गेले होतें. मी किती रडलें. आईच्या पायासुद्धां पडलें. पण त्यांचा निश्चय झाला होता. सोलापूरला मी पहाऱ्यांत होतें. माझ्यावर माझ्या काका-काकूंची सक्त नजर होती. एक चिठोरंसुद्धां मी लिहूं शकलें नाहीं. सारीं माझ्या लग्न जमवण्याच्या जोरानं खटपटीला लागलीं. आईनं उपास धरले. आणि मला पत्र पाठवलं, मी तिच्या मना-विरुद्ध वागलें तर ती विहिरींत जीव देणार होती. काका-काकूंनींही मला उपदेशाच्या माऱ्यानं भंडावून सोडलं होतं. इकडे बाबांचीं पत्रं येतच होतीं. मी अगदीं कातावून गेलें. त्या जाचापेक्षां यांतून कशीतरी सुटका

करून घ्यावी असं वाटू लागलं मला. मी माझ्या मनाप्रमाणें वागण्या-इतकी धीट आहें असें मला वाटत होतं. पण आमच्या घरच्या वातावर-णाचा, आई वडिलांच्या त्यागाचा माझ्यावर फार परिणाम झाला. त्यांचा शब्द मोडण्याचं धैर्य मला झालं नाहीं. त्यानीं जमवून दिलेल्या लग्नाला मीं अखेर संमती दिली.

"लग्नाच्या दिवशीं तुम्ही सातारला धावत आलात. तुम्ही यावं आणि मला घेऊन जावं म्हणून मी परमेश्वराची किती प्रार्थना करीत होतें. या नको असलेल्या लग्नाच्या बेडींत आपला पाय अडकू नये असं मला सुद्धां फार वाटत होतं. किती तरी रात्रीं मीं रडून काढल्या. पण अखेर मी आई वडलांना शरण गेलें. लग्नाच्या दिवशीं तुम्ही आलांत. पण बाबांनीं आत येऊन मला धाकदपटशा दाखवला. आपली अब्रू सांभाळ म्हणून माझ्यावर उपदेशाचा मारा केला. डोळ्यांत अश्रू आणले आणि शेवटीं तर त्यांनीं माझे पाय धरले. तुम्ही माझी वाट पहात बाहेर होतांत. पण वडिलांच्या अब्रूसाठीं मी तुमच्याशीं खोटं बोललें तुमची माझी ओळख-सुद्धां नाहीं असं दाखवलं. त्याच्या धाकानं मीं तुम्हालाच खोटं ठरवलं असा तुमचा विश्वासघात मीं करायला नको होता हा निष्ठूरपणा मीं करायला नको होता. पण तो लग्नाचा दिवस होता. लग्न मोडलं असतं तर बाबांची अब्रू गेली असती. त्यानीं माझं आजन्म तोंड बघितलं नसतं. आईनं जीव दिला असता. मला कांहीं सुचेना. मी सर्वस्वी बाबांच्या ताब्यांत होतें. त्यांच्या हुकमतीनं मी एखाद्या कळसूत्री बाहुली सारखी वागत होतें. त्यामुळे तुमचा मात्र घात झाला. तुम्ही धापा टाकीत माझ्या विश्वासावर आलांत पण अखेर खरं बोलायचा धीर झाला नाहीं. खरं बोलायलाच माणसाला धैर्य लागतं. माणूस खोटं मात्र फार सफाईनं बोलतो. प्रभाकर, मला क्षमा करा. मी तुमची अपराधी आहें."

सुमन थांबली. तिचा स्वर भरून आला होता. मी मूढ होऊन गेलों होतों मला तिचा राग आला होता. मला तिची दया नाहीं आली. मुळींच नाहीं आली. नुसतं डोळ्यांतून पाणी काढलं म्हणून काय होतं ? मी म्हणालों—झालं तुझं सांगून ?

" आणखी एकच विनति आहे. तुमच्याकडे मला आतां पूर्वीच्या नात्यान बघतां यायच नाहीं. मुली पुरुषा इतक्या स्वतंत्र नसतात. मला वाटत होत कीं मी धीट आहें. पण मी भित्रीच निघालें. ज्याच्याशीं माझं लग्न झाल ते चांगले आहेत. त्याच्याशींच मीं आतां निष्ठेन वागायचं ठरवलं आहे.

" तुम्ही मात्र सारं विसरून जा. जें झाल ते झालच नव्हतं असं समजा. तुमच्या आयुष्यांत मी आले होतें आणि एकाएकीं निघून गेलें ही घटना फळयावरच्या अक्षरासारखी विवेकाच्या बोळयान पुसून टाका. तुम्ही तरुण आहांत, तुम्ही हुशार आहात. तुम्ही लग्न करून सुखी व्हावं अशीच माझी इच्छा आहे. कधीं सातारला आलांत तर मला भेटल्याशिवाय जाऊ नका. भाऊ म्हणून मी तुमच अवश्य स्वागत करीन."

" बडबड बंद कर. " मी मोठ्यानं ओरडलों. " एकूण तूं निरवानिरव करायला आली आहेस. नांव काय तुझं ! आपट्यांनीं काय नांव ठेवलय तुझं ! लक्ष्मी ! उमा ! "

" सावित्री. "

" सावित्रीबाई आपटे काय ! सावित्री अशी होती होय ! सुमन या नांवाची विटंबना पुरे नाहीं झाली ! सावित्री या नावाची विटंबना तूं कशाला करतेस सुमन ! जीवाभावान केलेलं प्रेम अस आठ दिवसात माणसाच्या जातीला विसरतां येतं ! ज्याला पतीच्या नात्यान हजारो वेळां आलिंगन दिलींस त्याला भाऊ म्हणून बीजेची आरती ओवाळता येते स्त्रीला ! स्त्रीजात एवढी विसरभोळी आहे ! स्त्री एवढी हृदयशून्य असू शकते ! स्त्री ही चाचल्याची मूर्ती आणि मूर्तिमंत विश्वासघातकी म्हणतात तेंच खर आहे. एवढया लौकर तूं मला विसरलीस, एवढ्या लौकर तूं आपल्या प्रेमाला विसरलीस ! "

" पण माझं ऐका ना थोडं. " सुमन मधेंच बोलू लागली. तिला थांबवून मी म्हणालों, " थांब. आतां मधेंच बोलूं नकोस. आतां माझं ऐकून घे. इतक्या थोडया अवधींत तूं आपली स्वप्नं व्यवहाराच्या डोहांत बुडवून टाकलींस ! रात्रंदिवस मी दिसत होतों ना तुला ! माझा आवाज

ऐकूं येत होता ना तुला ? माझ्या पावलांचा भास होत होता ना तुला ? स्वप्नांचे इमले उभारणारी तू स्वर्गातली परी, तूं एवढ्या लौकर या व्यवहाराच्या रुक्ष बाजारांत प्रेमाचे भाव ठरवूं लागलीस ? व्यक्तींची अदलाबदल तुला करायच जमून गेल ना ? चार महिन्यापूर्वी मी पृथ्वी-मोलाचा होतों, तो आज एकदम कवडी किंमतीचा ठरलों ?

" तुला मार्ग उरला नाहीं काय ? इच्छा असते तिथें मार्ग असतो. तुला माझ्याशीं बोलता आल नसत. मला पत्र लिहिता आल नसतं. माझ्याशीं काडीचाहि सपर्क तुला ठेवतां आला नसता हें सार मला मान्य आहे. पण तुझ्या आईबापाना तू एवढी शरण कशी गेलीस ? त्यांची तुला भीति वाटली आणि माझी नाहीं वाटली ? त्यांच्यासाठीं तू लग्नाला तयार झालीस आणि माझ्यासाठीं तुला कांहींच करावस वाटलं नाहीं ? हें लग्न तू होऊ कस दिलस ? या पापाला, या अनर्थाला तू तयार कशी झालीस ? त्याच्या गळ्यात माळ घालताना ती गळून कशी नाहीं पडली ? वाजत्रीचा कडकडाट ऐकून तुला पळून जावस कां नाहीं वाटल ? मुडावळ्या तूं खुशीन बांधून घेतल्यास ? "

मी सारखा बोलत होतों आणि सुमन सारखी रडत होती. पण मला तिची मुळींच दया आली नाहीं. मी म्हणालों, " रडण्याचं हें नाटक माझ्यासमोर करू नकोस. तूं ढोंगी आहेस. तूं विश्वासघातकी आहेस. प्रेम म्हणजे तुम्हां पोरींना नुसता खेळ वाटतो. तुम्ही खेळतां पण दुसऱ्याचा जीव जातो. माझ्या आयुष्याचा सत्यानाश तूं केलास. तूं याला जबाबदार आहेस. तुझ्या विचारानं मी आजारीसुद्धां पडलों. पण जिच्यासाठीं मीं माझ्या जीवाचं पाणी केलं ती एक नकली बाहुली निघाली. तुला देवानं सौंदर्य दिलं पण अंतःकरण दिलं नाहीं....... "

" नका हो, नका असं बोलूं. मी चुकलें. माझ्या अंतःकरणाचे खरंच तुकडे झाले तेव्हां. "

" तुकडे झाले ना ? मग हें लग्न कसं केलंस ? आणि मोठ्या तोंडानं मला म्हणतेस कीं विवेकाच्या बोळ्यानं पुसून टाका. विवेकाचे बोळे करणारे लोक भावनाशून्य असतात. मी तसा नाहीं. पण एक ऐकून ठेव. प्रेमावरचा माझा

विश्वास या क्षणीं साफ उडाला. स्त्रीला पुरुष आणि पुरुषाला स्त्रीची अभिलाषा असते. गरज असते या पलीकडे त्यांत उदात्ततेचा अंशसुद्धां नाहीं. इतके दिवस मी उगीचच झुरलों. चल जा. चालती हो इथून. मला पुन्हां तोंड दाखवू नकोस. माझ्या आयुष्यांत डोकावून पहाण्याचं तुला काडीमात्र कारण नाहीं. चल जा नीघ इथून. ''

मी ओरडलोंच. मांजराला, कुत्र्याला हाकून देतो ना आपण, तशी मी तिला घरा बाहेर काढीत होतों. ती निघून गेली पण माझ्या मनाची आग शांत झाली नव्हती. नुसती जळजळ होत होती. प्रेम प्रेम म्हणून ज्या भावनेला लोक वेडयासारखे कवटाळतात ते अखेर वेडे ठरतात. वेडे नाहींतर काय ? ती भावना म्हणजे नुसता एक विकार आहे. भावनेचा भास उत्पन्न करणारी ही एक धुंदी आहे. तरुणपणीं खेळायचा हा एक नुसता खेळ आहे पत्ते नाहीं कां आपण खेळत ? सोंगट्या नाहीं कां आपण खेळत ? तसाच हा एक खेळ. जन्मभर हा खेळायचा, आणि करमणूक करून घ्यायची. भिडू अमकाच हवा असा इतर खेळात आग्रह धरतों कां आपण ? मग याच खेळात कां म्हणून ? कोणी का असेना ? खेळांत तो तरबेज आहे कीं नाहीं हीच त्याची कसोटी. उगाच इतके दिवस मी वेडयासारखा वागलो, आणि झुरलों. पण बर झाल. एक खेळ खेळून झाला. आतां दुसरा. पहिल्यांत धडे मिळाले. नवीन होतों म्हणून पाशात अडकलों. आतां ही चूक पुन्हां नाहीं करणार. भावना नांवाच्या ढोंगी विकाराच्या आता आधीन नाहीं होणार. शुद्ध विकारानच हा खेळ खेळीन. मी खेळीन दुसऱ्या व्यक्तीला खेळवीन. डाव अंगावर उलटू तर नाहींच देणार. पण दुसऱ्यावर उलटवीन मात्र. म्हणे भाऊ म्हणून या. मूर्ख आहेस. जगांत भाऊ बहिणी अशा कितीशा आहेत ? फसव नातं आहे हें. जगांत कोणी कोणाचा नाहीं. तू विसरलीस ना मला एवढ्या लौकर ! आणि तरी तूं माझ्या एकदां किती जवळ आली होतीस. याचा अर्थ काय ? जगांत आई बाप सोडून फक्त एकच नातं आहे. स्त्री पुरुष !

---

# ४

प्रभाकरपंतांनी बराच वेळानं कूस पालटली. एकाच बाजूवर निजून निजून ती दुखू लागली होती. पण विचार करण्यांत, आयुष्यांतील एका महत्वाच्या घटनेची नुसती आठवण करण्यात एक तास निघून गेला होता. केवळ स्मृतीमुळें जी गोष्ट एका तासाच्या अवकाशांत सामावून राहिली, तिच्या यातना प्रभाकरपतांना किती तरी दिवस भोगाव्या लागल्या होत्या. कटु अनुभवाची प्रत्यक्ष अनुभूति प्रसरण पाऊन प्रचंड रूपानं माणसांचा किती तरी वेळ खाते आणि मानासिक व्यथेची लांबी रुंदी वाढवीत रहाते. सुखाचा प्रत्यक्ष अनुभव मात्र क्षणमात्र येतो आणि त्याची स्मृतीच तेवढी घोळघोळून माणसाला दीर्घकालीन सौख्याचा आभास निर्माण करावा लागतो.

प्रभाकरपतांनीं आयुष्यांतील सुमन कवेंच पान उलटून टाकलं. पुढचा मजकूर ते वाचू लागले. लिहिलेला तर होताच. आतां फक्त वाचायचाच. पण एवढा महत्वाचा लेख लग्न झाल्यापासून आपण एकदांसुद्धां बसा नाहीं वाचला ! वेळ झालाच नाहीं. आणि जरूर तरी काय पुन्हां वाचायची ! आयुष्य पुढें जात असत. माणस त्या आयुष्यांतून वहात वहात पुढेंच जात असतात. उगीच, कारण झाल्याशिवाय कोण मागें वळून पहातो ! शिवाय मागें वळून पहायला तरी आधीं पुढें गेल पाहिजे ना ! आज आपल्या वयाला बेचाळीस वर्षे उलटून गेलीं. कांहीं वर्षे तरी आपण आयुष्य जगलों. अनुभव घेतले. जग पाहिलं आतां मधूनच मागें वळून एखादा दृष्टि-क्षेप टाकायला हरकत नाहीं. किती रस्ता तुडवला आपण ! रस्त्यांत कोण कोण भेटले ! त्यांच्या भेटीचा आपल्या आयुष्यावर काय परिणाम झाला ! माणूस जेव्हां तरुण असतो, जवान असतो, जवानीची रग त्याच्या अंगांत मुसमुसत असते तेव्हां त्याची दृष्टि पुढें असते. त्याच्या गाडीचा वेग भरधाव असतो. मागें काय झालं याची उजळणी करण्यापेक्षां तो पुढच्या

दृष्यावर नजर ठेऊन असतो. तेव्हा तो गाडी थाबवीत नाहीं. मागें वळून पहात नाहीं. तो पुढेंच जात असतो. असा बराच पुढें गेला कीं मग असा एक टप्पा येतो कीं त्याला वाटत आतां इथें आपण थांबावं. पुढें तर जायचंच आहे. पण आलों तरी किती ? प्रभाकरपतांच हे वय अस होतं कीं त्यांना होऊन गेलेल्या दिवसाची आठवण कराविशी वाटली. आयुष्यात घडलं तरी काय याचा विचार करावासा वाटला. वेळ जात नाहीं, झोप येत नाहीं म्हणून, नाईलाज म्हणून जुन्या गोष्टींची आठवण करूं लागले पण आता आपल्याच जीवनाच्या भूतकालीन चित्रपटाविषयीं त्याना आस्था उत्पन्न झाली. अगत्य उत्पन्न झालं. आठवणी करतांनाहि माणूस त्या स्थितीचा पुन्हा अनुभव घेऊ शकतो, त्या त्या सुख दुःखाचा साक्षात्कार नव्यान होऊ लागतो आणि त्यातहि एक प्रकारें मन रमून जातं, वर्तमानकालाचा विसर पडतो हा अनुभव त्याना आज उत्कटत्वानं आला. त्यानीं आपल्या जवळच आरामखुर्चीवर शांतपणें झोपीं गेलेल्या पत्नीकडे पाहिल. सुमन कर्वे निघून गेल्यानतर आणखी एका मुलीची ओळख व्हावयाची होती. तिची ओळख झाल्याशिवाय हिची ओळख होणं शक्य नव्हतं. प्रभाकरपंतांनीं पत्नीकडे थोडया तिऱ्हाईत नजरेनं पाहिलं. आणि तिच्याकडे पाठ फिरवली. जणु ते म्हणाले, तुला अजून अवकाश आहे. जरा थाब.

प्रभाकरपंत स्वतःशींच बोलू लागले. सुमन आयुष्यातून निघून गेली तेव्हांपासून आपल्या मनाची बैठक पार बदलून गेली. प्रेम आणि पावित्र्य या गोष्टी केवळ चर्चेच्या, तत्व म्हणून ठीक आहेत. प्रत्यक्षांत कोण असे देवदूत लागून गेले आहेत ! धुतलेल्या तांदुळासारखी स्वच्छ अतःकरणाची माणसं जगाच्या बाजारांत किती आहेत ! सोळ, ओंळं, शुद्ध, निषिद्ध, पावित्र्य, उदात्त कल्पना, विशाल सहानुभूति याची ओझीं, आम्हीं तेवढीं आमच्या बुद्धीवर लादून घ्यायची. जीवाची परवां न करतां आचारधर्मांचं पालन करायचं आणि तिकडे जगांत मारे फसवाफसवी, लांडीलबाडी, अप्रामाणिकपणा, विश्वासघात याना ऊत आला आहे. सगळं जग केवळ स्वार्थानं लडबडलेलं आहे. पाप केल्याशिवाय या दुनियेत कोणीहि ताठ

मानेनं चालणारा राहिला नाहीं मग मींच काय म्हणून या निर्बंधाच्या काचात अडकून पडाव ? शिवाय ज्या व्यक्तीसाठीं आपण आपला जीव खाखडतों तिला तरी त्याची परवा आहे काय ?

छे ! हें सगळ उगीच आहे. प्रेमाच पावित्र्य ही एक उदात्ततेची खुळी कल्पना आहे. दिलेला शब्द पाळण, वचनाची पूर्ती करण ही एक कवि कल्पना आहे, एखाद्यासाठीं आपल्या जीवाचा आटापिटा करीत रहाण ही वेडेपणाची निशाणी आहे. जग ही काहीं सन्याशाची भली मोठी मठी नव्हे. जगांत येऊन सुखोपभोगाचा मनमुराद आस्वाद न घेईल तो करंटा. माणसान नाना तऱ्हा पहाव्या, नाना चवी घ्याव्या, कोणत्या विशेष आस्वाद्य, कोणत्या टाकाऊ, कोणांत काय वैशिष्ठय, याची तुलना करीत पहिल खेळण टाकून नव्या खेळण्याकडे पहिल्याच उत्साहान धाव घ्यावी. यालाच जीवन म्हणतात. यालाच आयुष्य म्हणतात. यालाच सुखोपभोग म्हणतात. कोणी कोणाचा घात करीत नाहीं. ज्याला जें बर वाटेल तें त्यानं करावं. मी तरी निदान असच ठरवून टाकलं.

माझ्या आयुष्यातून सुमन बेदरकारपणान निघून गेली तर तितक्याच आस्थेन दुसऱ्या एका मुलीन प्रवेश केला. मी मनांत म्हणालों, हें नवं नाटक. हें आता दुसर नवं पात्र. नाहीं तरी जीवन म्हणजे नाटकच आहे. ज्याला नाटक करता येत नाहीं त्याला जगांत लायकीन जगतां येत नाहीं. त्याला अभिनय आला पाहिजे. आपल्या भूमिकेच महत्त्व वाढवून इतर भूमिकांची रेवडी उडवितां आली पाहिजे. असा कुशल नटच जगतो. बाकीचीं मरतात. पण मला तर जगायचं होतं. आयुष्य उपभोगायचं होतं. या दुसऱ्या पात्राचं मीं मोठ्या आनंदानं स्वागत केल. ओळख कुठें आणि कशी झाली या तपशीलाचा काथ्याकूट हवा कशाला ? जगांत एवढ्या लोकांच्या आपल्या ओळखी होतात, तशीच तिची आणि माझी झाली. वयानं ही मुलगी सुमनपेक्षा थोडी लहान होती रूपानं मात्र अजिबात निराळी होती. रग सावळा, डोळे काळेभोर, सुंदर, रेखीव, तरतरीत नाक, मोठं कपाळ आणि विपुल केशसंभाराची ती गुंफलेली मऊ वेणी. बांधा, ऊंची, दांत या सर्वांत ती आदर्श होती. जिवणीच्या पाकळ्या तर एखाद्याचा

आणि भारी नाजुक. ही मुलगी मला फार आवडली. नांव होत सुमित्रा. बारशाच्या वेळीं थोडीशीच चूक झाली होती. सुनेत्रा नांव ठेवल असतं कीं सगळ जमत होत. पण एवढ्या लहानपणीं मला वाटत रूपाची कांहीं कल्पना येत नाहीं. आणि आई बाप सुचेल तें नांव ठेवतात.

ही एका सुधारकाची मुलगी. तिला इतरांपेक्षां थोडया अधिक सवलतीं होत्या. स्त्रीपुरुषांत मिसळून वागायची तिला सवय होती. तिच्या मैत्रिणी होत्या तसे मित्रसुद्धा होते. ती आमच्या घरीं येत होती. आणि मीसुद्धां तिच्या घरीं उघड उघड जात होतो. त्यामुळें चोरून भेटण्याचा खटाटोप सुरवातीला तरी करावा लागला नाहीं. पण हळू हळू आमच्यांत आकर्षण उत्पन्न होऊ लागल. सहवासाची ओढ निर्माण होऊ लागली. त्यामुळें कांहीं तरी निमित्यान किंवा कांहीं निमित्त नसतांनाहि मी तिच्याकडे जास्ती वेळ बसूं लागलों. बोलत काय होतों हें आमचं आम्हाला माहीत. त्यांत कांहीं विशेषत्व नव्हतं. ज्या गोष्टी मीं सुमनबरोबर केल्या त्याच गोष्टी मी सुमित्राशीं करूं लागलों. अहो, माणसं वेगळीं असलीं तरीं सर्वांच्या मनांत धिंगाणा घालणाऱ्या शृंगाराच्या भावनेच स्वरूप केव्हांहि एकच असत. माणस मग थोडया फार फरकान त्याच कृति करूं लागतात. जवळ येण्याची ती धडपड, एकमेकाना सोडून जातांना मनाची होणारी व्याकूळ स्थिती, स्पर्शसुखान वेडावून जाऊन जगाचा विसर पडण, या साऱ्या त्याच त्या गोष्टींची पुनरावृत्ति होत असते. यांत नाविन्य कांहींच नाहीं. पण त्या हव्याशा मात्र वाटतात. सुमनच्या सहवासांत जसा मी रंगून जात होतों, तसाच आतां सुमित्रेच्या सहवासांतहि दंग होऊन रहात होतों.

सुमनसारखीच सुमित्राहि माझ्यासाठीं जीव टाकीत होती. मी गेलों कीं किती तरी पदार्थ मला ती खायला देई. मला चहा फार आवडतो हें समजल्यापासून तिनं मला एक दिवससुद्धां चहा घेतल्याशिवाय जाऊं दिलं नाहीं. सुमननं मला स्कार्फ दिला होता तर हिनं मला स्वेटर दिला. आभरे विणून दिले. हातरुमालावर माझीं नांवं रेशमानं भरून दिलीं. फार काय,

पण एक दिवस मला पडसं आलं होतं, आणि तरीहि मी तिच्या घरीं गेलो होतो तर तिनं मला काढासुद्धां करून पाजला.

या साऱ्या गोष्टींचा स्वीकार करताना मला बरं वाटत होतं. तरी त्या पहिल्या अनुभवातली बेहोशी येऊ न देण्याची खबरदारी घेण्याचा माझा प्रयत्न चालला होता. कधीं हें जमे तर कधीं मी मलाच विसरून जाई. एखाद्या वेळीं मला सुमनची आठवण येई. पण लगेच तिचा राग येई. असं वाटे कीं ती आपल्या त्या नवऱ्याशीं सुखानं आणि निष्ठेनं संसार करते आहे मग मी काय म्हणून तिची आतां, या सुखाच्या क्षणीं आठवण करावी.

असं वाटे खरं. पण आठवण मधून मधून येत होती. माझ्या नकळत मी दोघींची तुलना करी. दोघींच्या स्पर्शांत उत्कटता वाटे खरी. पण दोघींच्याहि स्पर्शसुखाची गोडी काहीं निराळी वाटे. दोघींतहि आर्जवशक्ति विलक्षण वास करीत होती. दोघीहि लाडिकपणांत तरबेज होत्या. सुमनच्या डोळ्यात बोलता बोलता पाणी येई. तो वेडेपणा सुमित्रानं केला नाहीं. सुमन स्वप्नाळु होती. तो स्वप्नाळुपणा मात्र सुमित्रानं कधीं दाखविला नाहीं.

आतां सुमित्रानं विणलेला स्वेटर मी घालू लागलो होतो. तो स्कार्फ मात्र मला कधीं घालावासा वाटला नाहीं. त्याला कधीं स्पर्श करण्याची सुद्धां मला इच्छा होईना. अखेर अखेर तो डोळ्यासमोरसुद्धां नकोसा झाला. म्हणून एक दिवस तो मी भिकाऱ्याला देऊन टाकला.

आता मला सुमित्रेच्या सहवासाची चटक लागली होती. घरांत माणसं असत. एकांतांत भेटण्याची माझ्या मनाला आणि तिच्याहि मनाला आस लागली होती मग आम्ही फिरायला जाऊ लागलों. उघड उघड सांगून जाण्याची सोय नव्हती. पण काहीं तरी करून अधून मधून आम्ही हें जमवीत होतों.

सुमित्राचा आवाज भारी गोड होता. त्यावेळीं बालगंधर्वांच्या रेकॉर्डस् खूप निघाल्या होत्या. बोलका सिनेमा नवीनच सुरू झाला होता. सिनेमा नाटकांतल्या सगळ्या चाली ती अगदीं सहज आणि गोड गळ्यानं म्हणे. सुमनपेक्षां सुमित्रेंत हा गुण अधिक होता. तिच्या गाण्याची मोहिनी

माझ्यावर पडत असे यांत मुळींच शका नाहीं. एक दिवस मी तिच्या घरीं गेलों. ती तंबोरा घेऊन बसली होती. कोणत्या तरी रागाचे आर्त सूर आळवीत होती. वेळ सध्याकाळची होती. सूर्याचं बिंब क्षीतराजापलीकडे जात होत. आकाशांत निळ्या, जांभळ्या, तांबड्या, शेंदरी अशा नाना रंगांच्या चित्रविचित्र आकृति दिसत होत्या. संधीप्रकाशातील एक उदास छाया घरभर पसरली होती. मनाला हुरहुर उत्पन्न करणारी ही वेळ होती. आणि अशा वेळीं सुमित्रा गात होती. 'कोयलीया मत करी पुकार लागे कलिजवा कटार' ही ओळ ऐकली आणि काळजांत अगदीं घाव बसल्या- सारख वाटलं. माझा जीव कट्यार लागल्यासारखा घायाळ होऊन उठला. अंतःकरणाला जणु स्वरांची मिठी बसली. गाण्यातल्या भावना स्वरातून पाझरत पाझरत येऊन माझ्या अतःकरणाला हलवू लागल्या. सुमित्राच्या सहवासांत भाव न विसरण्याचा माझा प्रयत्न असे. पण तिच्या गाण्याचं सामर्थ्य मात्र असं होत कीं हृदयाचे पापुद्रे घायाळ पाखराच्या पखासारखे फडफडूं लागले. 'कोयालिया मत करी पुकार' हे शब्द म्हणताना सुमित्रा पुन्हां पुन्हां माझ्याकडे पहात होती. अस वाटल कीं जगात फक्त सुमित्रा आणि मीच आहोंत. आणि तिच्या माझ्यामध्यें विरहाची केवढी प्रचंड दरी पसरली आहे. मन भारी व्याकूळ झाल. खरंच, सगीत कलेच सामर्थ्य केवढ प्रचंड आहे! जगाची भूल पाडण्याची शक्ति केवढी अचाट आहे, आणि प्रेमाच्या राज्यावर नेऊन बसवणारी ही केवढी वैभवशाली कला आहे! क्षणभर असं वाटलं कीं गायनही वशीकरण विद्या आहे. गायनाची मोहिनीच अजब आहे. सुमित्राच्या कोणत्याही गोष्टीला मी हार जात नव्हतों. पण तिच्या संगीताला, तिच्या आवाजाला, तिनं घेतलेल्या त्या आर्तस्वरांना मात्र मी शरण होतों. गाण्यानं परिणाम होणार नाहीं असा कोण आहे? स्वरानीं ज्याच्या अंतःकरणाची तार छेडली जाणार नाहीं असा माणूस कोणी असूं शकेल काय? एक तो बहिरा तरी असला पाहिजे किंवा मुका तरी असला पाहिजे. सुमित्रा गाणं शिकत होती. पण तिला गाण्याचा कान उपजतच होता. ती जेवढं शिकत होती तेवढंच नव गाणं ती मनानं गात होती. तेवढ्यापुरता मी अगदीं वेडा होऊन गेलों. असं

वाटलं कीं हिच्या पाशांत न जाण्याचा वेडा निश्चय मोडून टाकावा. आणि जन्माची गांठ बांधून घेऊन जन्मभर या कोकीळेचा स्वरविलास ऐकत रहावा. माझ्या वृत्ती अनावर झाल्या. सुमित्रा म्हणत होती " लागे कलिजवा कट्यार " असं वाटलं कीं ती हें सार मलाच उद्देशून म्हणत आहे. तिच्याहि डोळ्यांत तो भाव तरगताना दिसत होता, माझ्या प्रेमाचीं आर्जवं ती सुमनपेक्षां निराळ्या तऱ्हेनं करीत होती.

सुमित्रान तम्बोरा खालीं ठेवला. रात्र झाली होती. घरीं जाणच भाग होत. ही सध्याकाळची वेळ असती तर सुमित्रेला घेऊन मी फिरायला गेलों असतो. तिन उच्चारलेला प्रत्येक शब्द मीं झेलून घेतला असता. तिच्या सौंदर्यदर्शनाच, तिच्या सहवासाच सौख्य मीं उपभोगल असत. पण रात्र झाल्यामुळे या साऱ्या इच्छा मला गुंडाळून ठेवाव्या लागल्या. मी जायला निघालों. मी म्हणालों, " जातों आतां. रात्र झाली आहे म्हणून. नाहीं तर तुझ आणखी एखाद गाण ऐकलं असतं. आवाज फार गोड आहे तुझा. स्वराबरोबर भावनेचा परिपोष करण्यांतहि तू कुशल आहेस. पुन्हां केव्हां तरी ऐकेन. गाणं शीक तूं सोडूं नकोस. बरं. जातों मी "

असं म्हणून मी जायला निघालों. ती विशेष कांहीं बोलली नाहीं. माझ्या उत्तेजनाचा मात्र तिला आनंद झाला होता. शिवाय ती विशेष काय बोलणार? बोलायचं तें ती स्वरांतूनच बोलली होती. डोळ्यांनीं मला सांगत होती. या दोन भाषांपेक्षां का शब्दांची भाषा अधिक श्रीमंत होती? तिच्या त्या पहाऱ्यांतूनच मी काय समजायचं तें समजलों. ' कोयलिया मत करी पुकार लागे कलिजवा कटार ' या दोन ओळींनीं जें मला सांगितलं त्यापेक्षां आणखी कांहीं सांगायला निराळे शब्द नव्हते. माझ्या सहवासाची ओढ तिच्या त्या गाण्यांतूनच व्यक्त झाली होती. माझ्यासाठीं तिचा जीव किती झुरत होता हें मला तेव्हांच समजून चुकलं होतं. पण समजून कांहीं उपयोग नव्हता. रात्र झाली होती. आणि तरीसुद्धां मी कांहीं कारण नसतांना तिथें बसून रहाणं फार वाईट दिसलं असतं. मला तिथून उठायलाच हव होतं. तो मोह मला टाळायलाच हवा होता,

म्हणून मी निघालों. तिचा निरोप घेतला. ती "बर" म्हणाली. आणि दारापर्यंत पोंचवायला आली. "उद्यां येणार ना?"

"हो"

"मी म्हटलेलं गाणं खरंच आवडलं तुम्हाला?"

"खरंच आवडलं. हा व्यासंग तूं सोडू नकोस. संगीत विद्या अवगत असलेला माणूस खराखुरा श्रीमत असतो. जगाची त्याला परवा नसते. तूं ही कला अर्धवट सोडूं नकोस. हिचा तुला अवश्य उपयोग होईल. जेव्हां कोणी नसेल तेव्हां हें गाणं तुला सोबत करील."

"तुमच्या उत्तेजनानं मला किती बर वाटतं आहे म्हणून सांगू? इतरांनीं तोंड फाटेपर्यंत स्तुति केली तरी त्याला जें मोल नाहीं ते मोल तुमच्या एका शब्दाला आहे प्रभाकर. आज मला फार आनंद झाला आहे. उद्या या. विसरू नका."

"नाहीं विसरणार. येईन. जरूर येईन." असं म्हणून मीं तिचा हात हातांत घेऊन तो ओठाजवळ नेला. आणि जड पावलांनीं तिथून निघालों. मी दिसेनासा होईपर्यंत ती तिथें उभी होती.

सुमनपेक्षां सुमित्रा वयानं लहान असूनहि तिच्या बुद्धीची झेप सुमनपेक्षां मोठी होती. तिच्याजवळ प्रतिभा होती. एखाद्या विषयावर चर्चा करण्याची, प्रसंगीं वाद घालण्याची तिची कुवत होती. याचं कारण मला वाटतं सुमित्रा सुमनसारखी स्वप्नाळू नव्हती. व्याख्यानाना जाणं, नवीं नवीं पुस्तकं वाचणं, आपलीं मतं ठरवणं आणि 'माझं असं मत आहे' म्हणून आग्रहानं प्रतिपादन करणं याची तिला मनापासून आवड होती. माझ्या मोहपाशांत ती अडकत होती तरी स्त्रीपुरुष आकर्षणापलिकडेहि जगांत कांहीं निराळ्या गोष्टी आहेत याची तिला जाणीव असे. माझ्या स्पर्शसुखाचा अनुभव घेतांनाहि ती मला कधीं असं म्हणाली नाहीं कीं "मला अभ्यास करावासा वाटत नाहीं." हा तिचा गुण मला खरं म्हणजे आवडत होता. तरी माझ्या मनाची इच्छा मात्र अशी होती कीं सुमित्रानं एकदां तरी मला म्हणावं "तुमच्याशिवाय इतर कोणत्याहि गोष्टीचा मला अगदीं वीट आला आहे. अभ्यास नको. खाणं नको, पिणं

नको. " पण ती असं कधीं म्हणाली नाहीं. एकदां असं मात्र म्हणाली होती कीं " तुम्हाला पाहून माझं पोट भरतं. तुम्ही आलांत कीं माझी तहान भूक हरपते. कृष्णाला पाहून राधेची हरत होती तशी. "

पण मी म्हणालों, " तुला पाहून माझी मात्र भूक वाढते बुवा. तुझ्या वाटणीचे चिरोटे मीच खातों. घाल मला. "

असे आपले दिवस जात होते. निःशंक मनानं तिन आपलं मन माझ्या स्वाधीन केलं होतं. स्पर्श सुखाबाबत काहीं एका मर्यादेपर्यंत तिनं माझ्यावर विश्वास टाकला होता. त्यामुळेंच कीं काय ती आपला अधिकार माझ्यावर गाजवूं लागली होती. तिच माझ्याशीं लग्नच झाल आहे अशा थाटात ती कधीं कधीं माझ्याशीं वागे. मला चुकून एखाद्या दिवशीं साडे नव्याण्णव ताप आला तर ती तासन् तास काळजी करीत बसे. माझ्या येण्याची वाट पहात उभी राही. मी काय जेवलों याची न चुकता चौकशी करी. मी चहा फार पिऊ नये आणि दूध प्यायला विसरू नये या विषयावर ती मला रोज प्रवचन ऐकवी. एक दिवस तिनं मला विचारलं, " हल्लीं अभ्यास करीत नाहीं वाटत ? "

" कशावरून ? " मी म्हणालों.

" तें दिसतच आहे. कॉलेजात जातां तेवढा वेळच अभ्यास. बाकीचा वेळ कादंबऱ्या वाचता. आणि संधी मिळाली कीं इकडे येतां. मग अभ्यास केव्हां करतां हो ? "

" आणि समज, मीं नाहीं केला अभ्यास, यंदा नाहीं पास झालों, तर काय होईल ? "

" मला फार वाईट वाटेल. तुमचं वर्ष विनाकारण फुकट जाईल. "

" बरं जाईल. पण तुझा काय संबंध ? "

" तें तुम्हीच आपल्या मनाला विचारा ना. तुम्ही नापास झालांत तर मला बरं वाटेल. मी पेढे आणून वाटीन. असंच वाटतंय ना तुम्हाला ? मी जशी कांहीं तुमची कोणीच नाहीं. "

" माझी कोण आहेस तूं ? "

" तें मी कशाला सांगूं ? तुम्हीच सांगा ना. "

" माझी मैत्रीण आहेस तूं. मी तुझा एक मित्र आहे. "

" आपण नुसते मित्रच आहोंत ना ! जातीनं पुरुष आहांत तुम्ही. म्हणून अशी निर्दय थट्टा सुचते तुम्हाला. बायका आपल्या आवडत्या माणसावर किती प्रेम करतात तें त्यांच त्याना माहीत. प्रेमाची कल्पना तुम्हां पुरुषांना नाहीं येणार कधीं मीं विचारलं काय आणि कुठला विषय कुठें नेऊन भिडवलांत "

मी कांहींच बोललों नाहीं. आपल्या प्रेमाची ग्वाही कोणी देऊं लागलं कीं मला दुप्पट शंका येते. हेंच वाक्य सुमनसुद्धां अनेक वेळां म्हणाली होती. तिनं आपल्या प्रेमाची कदर किती ठेवली होती तें मला माहीत होतं. हिला सांगून काय उपयोग ! हिची आणि तिची जात काय वेगळी आहे ! हीसुद्धां असाच केव्हां तरी केसानं गळा कापणार. पण तिच्या हातीं माझा गळा सोपविण्या इतका मी आतां भाबडा तरुण राहिलों नव्हतों. प्रेमाचा खेळ मी दुसऱ्यांदा खेळत होतों. माझ्या हातांतले फासे नवाशिके नव्हते. मला आतां माहीत झाल होत कीं " तुमच्यावर माझं फार प्रेम आहे " अस आर्त स्वरानं म्हणून कोणा स्त्रीनं डोळ्यांना पदर लावला तर डोळे मिटून समजाव कीं ही लौकरच लग्नाची गळ घालणार. केव्हां तरी लग्न पाशाच्या बधनांत अडकविण्याची घाई करणार. ' तुम्ही पुरुष निर्दय, आम्हां स्त्रियांच्या प्रेमाची...' वगैरे ठराविक आणि निरर्थक बडबड सुरू होतांच मीं विषय बदलून टाकला.

पण माझा विषय पालट या वेडया मुलीनं मनावर घेतला नाहीं. क्षणा-पूर्वीचं माझ तुटक बोलण ती विसरून गेली. आणि पुन्हां पहिल्या सारखंच ती बोलूं लागली. मी म्हणालों " उद्यां मी ट्रिपवर जाणार आहें. "

" कोणत्या ! "

" मुंबईला जाणार आहे. "

" असं होय ! मी म्हटलं कुठें दिल्ली आग्र्याला जाणार आहांत की काय ! "

" तिकडेसुद्धां जाईन. पण मुंबईपर्यंतचा अनुभव घेऊन पहातों कीं आपल्याला झेपत आहे कीं नाहीं ! "

" मुंबईला गेला नाहीं तुम्ही कधी ? " आपले डोळे विस्फारीत तीं आश्चर्यानं म्हणाली.

" मुबईला गेलों आहें छप्पन्न वेळां. पण सायकल वरुन नाहीं गेलों. "

" म्हणजे उद्यां तुम्ही सायकलवरून जाणार आहांत तर. मग हें आधींच कां नाहीं सांगितल ? "

" तू विचारलंस कुठें मला ? "

" मी काय अतर्ज्ञानी आहे वाटतं ? पण मी तुम्हाला सागतें, तुम्ही सायकलवरून मुंबईला जाऊ नका. "

" का ? "

" मला भीति वाटते. "

" तुला भीति वाटते तर तूं जाऊ नकोस. "

" माझं नाहीं मी म्हणत. तुम्ही स्वतःच सायकलवरनं जाऊ नका. त्यांतून हे पावसाळ्याचे दिवस. मुंबईला जातांना वाटेंत केवढा तरी मोठा घाट लागतो. धुकं आलं, एखाद्या वेळीं पाय घसरला तर काय अनर्थ होईल याची कल्पना आहे का तुम्हाला !

" पाय घसरायला मी कांहीं पायीं जाणार नाहीं. "

" पाय म्हणजे सायकलचा पाय, चाक, माझं ऐका तुम्ही. तुम्ही जाल आणि माझ्या जीवाला नसता घोर. तें कांहीं नाहीं. माझ्या संमती-वाचून तुम्हांला कोणतीहि गोष्ट आतां करतां यायची नाहीं. मी जाऊ देणार नाहीं तुम्हाला "

" कां बरं ? "

" मी वेडी आहें म्हणून. खरंच पाया पडते तुमच्या. पण असला हा वेडेपणा करूं नका. कुठें तरी हात पाय मोडून बसाल आणि जन्माचं नुकसान होईल. मी जाऊं देणार नाहीं तुम्हांला. तुम्हांला तुमचा निश्चय मागें घेतला पाहिजे. आणि आज एकदम ठरल्यावर तुम्ही मला सांगतां आहांत होय ? माझा एका शब्दानं सल्ला घ्यावा असंसुद्धां वाटलं नाहीं ना तुम्हाला ? " ती रडकुंडीला आली होती.

" तूं सु–मित्रा आहेस. चांगला मित्र आपल्या मित्राचे पाय मागें ओढीत नाहीं कधीं. माझ्या या पराक्रमाला तूं अडथळा करणार नाहींस याची मला खात्री होतीच मुळीं. आणि तो निश्चय मीं, म्हणजे एका पुरुषानं केलेला आहे हें तूं विसरलीस. पुरुषांचे निश्चय ती गोष्ट अमलात आणण्यासाठीं केलेले असतात. मोड ण्यासाठीं नाहीं. उगीच काळजी करूं नकोस माझी. मी कांहीं दहा वर्षांचा लहान मुलगा नाहीं. माझ्या बरोबर आणखी दोन चार मित्र येणार आहेत. त्याचा जीव कांहीं वर नाहीं आलेला. ते जसें जाणार आहेत तसाच मी जाणार. उद्यां पहाटे चारला मी इथून निघणार आणि रात्रींपर्यंत केव्हां तरी मुंबईला पोंचू. दोन दिवस विश्रांति घेऊं. आणि पुन्हां परत येऊं सायकलवरनं. "

" ठरलं का नक्की ? "

मी " होय " म्हणतांच सुमित्रा दहा मिनिटं तशीच चिंताक्रान्त असून राहिली. पुन्हां म्हणाली " यात बदल नाहीं ना व्हायचा कांहीं ?"

" नाहीं. "

" हट्टी आहांत तुम्ही. बरं मग एवढं तरी कराल कां ? संध्याकाळीं पांच वाजतां ज्या गांवाला असाल तिथून सुखरूप असल्याचं तरी पत्र टाकाल का मला ? "

" हो टाकीन. "

" काय लिहाल त्यांत ? "

" सुखरूप आहे म्हणून लिहीन. वाटलं तर आत्तांच लिहून देतों. "

" आत्तां नको. उद्यां संध्याकाळीं जिथें असाल तिथून लिहा. पण सुखरूप असलांत तरच तसं लिहा. नाहीं तर काय झालं आहे तें कळवा."

" मग तूं काय करशील ? "

" तें पाहीन माझं मी. पण बरोबर काय द्यायचं करून ? "

" आई देईल ना करून. "

"आई देईल तें माहीत आहे मला. पण मला द्यायचं आहे. तुमच्या आईच्याच एक जीव चुटपुटत असतो वाटतं तुमच्यासाठीं ? असं हो काय करतां ? काय देऊं करून तें सांगा ना. " ती अगदीं आर्जवीनं म्हणाली. माझ्या

जवळ सरकून, माझ्या गळ्यांत हात घालून तिनं इतकं केविलवाणं माझ्याकडे पाहिलं कीं जसा कांहीं मी विलायतेला जायला निघालों होतों. आणि चार वर्षे तरी येणार नव्हतों. मी तिला जवळ ओढली आणि तिच्या दोन्हीं खांद्यांना धरून हालवीत म्हणालों " वेडी आहेस तूं. माझी मुळींच काळजी करू नकोस. तूं देशील ते पदार्थ मला आवडतील. उद्यां संध्याकाळीं तुला पत्र टाकतों. पण मी जर सुखरूप परत आलों तर मला काय देशील तू ! "

" तुम्ही मागाल तें ! माझ्याजवळ असेल तें सारं तुमचंच आहे. "

मी तोंडान बर बरं म्हणालो. आणि निघालों. रस्त्यावर येतां येतां एकदां मागें वळून बघितलं. सुमित्रा दारांतच उभी होती. एखाद्या चित्रासारखी दिसत होती. मी दूर जाणार, दोन दिवस भेटणार नाहीं या कल्पनेनं ती व्याकूळ झाली होती. रोज अगदीं रोज, ती अशीच दारांत उभी राही. मी दिसेनासा होईपर्यंत माझ्याकडे पहात राही. तिच्याकडे पुन्हां पुन्हां वळून पहाताना मला वाटे कीं यावेळीं सुमित्राला फक्त मी दिसतों आहें. तिच्या मनांत यावेळीं दुसऱ्या विचाराला, दुसऱ्या भावनेला थारा नाहीं. एवढी शिकलेली मुलगी, निरनिराळ्या विषयावर चर्चा करणारी ही तल्लख बुद्धीची मुलगी, पण ही सुद्धां माझ्या, एका पुरुषाच्या सहवासाची एवढी भुकेली होती. एका पुरुषाच्या सहवासासाठीं धडपडत होती. माझ्यासाठीं आपल्या जिवाची तडफड करून घेत होती. आणि या मानवी मनोविकारांना ही शिकलेली मूर्ख मुलगी प्रेम म्हणत होती. भावना समजत होती. निदान तिची ती भाषा होती. एरवीं तिच्या मनांत माझ्या विषयींची प्रीति खरंच का एवढी खोल रुजली असेल ! कसं शक्य आहे हें ! ज्या सुमनला मी म्हणालो होतों कीं " तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणाचाहि हात मी पत्नी या नात्यानं हातांत घेणार नाहीं. ती सुमन माझ्या आयुष्यांतुन निघून जातांच त्याच उत्कटतेनं मीं सुमित्रेचा हात धरला. त्याच आतुरतेनं तिच्या गळ्याभोंवतीं मीं माझे हात घातले. आणि तेव्हां मी तिच्यावर खरोखरीच प्रामाणिकपणान प्रेम करीत होतों. निदान मी तसं समजत होतों. पण हा नुसता खेळ असतो. परमेश्वर माणसाला

खेळवतो म्हणतात. आणि माणसं तरी दुसरं काय करतात? तीहि एक-मेकाना खेळवीत असतात. खेळत असतात. सुरवातीला माणूस स्वतः खेळणं होतो. नंतर तोच इतरांची खेळणी करतो.

मी तिला खेळणं समजत होतों. आणि तीहि माझं खेळणं करीत होती. नाहीं तर काय? स्त्री-पुरुषाच्या खेळाची मख्खी हीच कीं त्याला खेळ म्हणायचं नाहीं. त्याला प्रेम म्हणायच. आणि समोरच्या माणसाला आपलं खेळणं करूनहि बहाणा करायचा कीं 'मी सर्वस्वी तुझीच आहें. मी सर्वस्वी तुझाच आहें.' कोणी कोणाचा नसतो. एकमेकाला भेटण्यांत, एक-मेकांच्या सहवासांत राहण्यांत, एकमेकांचं स्पर्शसुख अनुभवण्यांत दोघांनाहि सुख होतं म्हणून हा खेळ खेळायचा असतो. भाषा मात्र वेगळी. हेतु वेगळा. पण भाषेंत त्याला उदात्त स्वरूप द्यायच. म्हणायचं कीं 'मी तुमच्यासाठीं माझा जीव पाखडतें.' पण तो जीव पाखडत असतो सुखा-साठीं. सुख मिळालं नाहीं कीं तो दुःखी होतो. काय म्हणाली मघाशीं ती मला? तुम्ही मागाल तें देईन. माझ्याजवळ जें आहे तें सारं तुमचंच आहे."

पण मी घेणारा एवढा वस्ताद, जबरा असतांना, तू काय मला देणार नाहींस? काहींहि देशील. वाटेल तें देशील. माझ्या आग्रहाखातर असं वरकरणी म्हणून, पण खरोखरी मनांतून स्वतःला हव म्हणून तूं कोणतीहि मर्यादा ओलांडायला तयार होशील. मुलींनीं ज्या गोष्टीपासून नेहमीं अलिप्त रहावं त्या गोष्टी करायला तूं तयार होशील. आणि एक दिवस माझा हात धरून म्हणशील कीं "या एवढ्या थराला या गोष्टी आल्या. आतां आपण लग्न करूं. करशीलसुद्धां तूं लग्न. सुमनसारखा पळून जाण्याचा प्रयत्न तूं करणारहि नाहींस कदाचित्. कारण मला खेळवायचा आहे ना तुला? आपला जीव घायाळ झाल्याचा देखावा करून मलाच कायद्यांच्या चौकटींत, अक्कलच्या पकडींत पकडण्याचा तुझा डाव मला समजत नाहीं असं थोडंच आहे? पण मीहि खेळ खेळलेला माणूस आहें. पुरुष एकदां फसतो. पुन्हां फसत नाहीं. तूं मला वाटेल तें द्यायला तयार होशील. आणि दिवस गेले म्हणजे म्हणशील कीं करा आतां माझ्याशीं लग्न. पण मी एवढा मूर्ख

नाहीं. एवढा कच्चा नाहीं. कुठून तरी मुलींची जात फसवाफसवीच करायला पहात असते. सुमनन मला अस फसवल माझ्या आयुष्यात येऊन एका-एकीं निर्विकार मनान ती चालती झाली आणि तू अशी घाई गर्दी करून, माझ्या आयुष्यात घुसून, माझ्या जीवनावर, माझ्यावर, माझ्या पैशावर आपला हक्क सांगू लागशील. जन्मभर तुला समाधान वाटेल कीं कस आपण एका माणसाला आपल्या जाळ्यात पकडल. छे! हें समाधान मी तुला लाभू देणार नाहीं. तुझ्याशीं खेळेन. पण अशा ठराविक अंतरावरून. तुला मी असा लळा लावीन. पण तुझा जीव घायाळ व्हावा म्हणून. तुझ्या सहवासाच, स्पर्षाच सुखहि मी उपभोगीन. पण तें मला सुख व्हाव म्हणून. माझ्या जीवाची करमणूक व्हावी म्हणून. तुझ्यासाठीं नाहीं. हा डाव मी माझ्यावर उलटवून घेणार नाहीं. एकदा मी फासात मान अड-कवून दोघाचा विचार केला आम्ही दोघ म्हणजे एकच आहोंत अस समजून सुमनच्या सुखाचा विचार मीं केला. तिच्याशिवाय आपल्याला जगता यायच नाहीं अशी मी खोटीच समजूत करून घेतली. पण आतां या भुलभुलावणीन मी फसण शक्य नाहीं. या खेळांत होणारे हे सारे भास आहेत. या खेळात माणसांना नेहमीं असच वाटतं कीं आपण दोघ एक आहोंत. आपल्या दोघाच सुख एकच आहे. आपल्या दोघांच्या जीवनाचे प्रवाह एक होऊन वहात आहेत. पण यातलं काय खरं झाल? यांतलं कोणतहि विधान खर करण्याचा सुमननं तर प्रयत्नसुद्धा नाहीं केला. आणि मीं केला. अगदीं जीवाचा आटापीटा केला. आजारी पडलों. बेशुद्ध झालों, कपाळ फोडून घेतल. तरीसुद्धा कांहीं दिवसाचा काळ लोटतांच ते सार विसरून गेलों. जस कांहीं पूर्वीं झालंच नव्हतं. असं म्हणून मीं नव्यान सुमित्रेच स्वागत केल. आता सुमित्राशीं वागण्यात मी कुठें कसर करतो आहे का? ज्या गोष्टी मीं सुमन बरोबर केल्या, त्याच मी सुमित्रे बरोबर करतो. तेवढ्याच तन्मयतेन करतो. त्याच सुखाच्या राशींत बुडून जातों. फक्त फरक एवढाच कीं तेव्हा मी अजाण होतो. आतां जाणता झालों आहें, तेव्हा हें सारं न समजता केल. आतां समजून करतों

आहे. म्हणूनच मला आतां पडण्याची भीति नाहीं. पाशांत अडकण्याचें भय नाहीं.

असा विचार करतां करतां मला एकप्रकारचं समाधान वाटलं. आपण भलत्या मार्गाला जाऊन फसत नाहीं याचं मला बरं वाटलं. आयुष्य हें चार दिवस गमत करण्यासाठीं आहे. कुठें तरी गळाला अडकून जन्मभर पश्चात्ताप करण्यासाठीं नाहीं. जें जे म्हणून या जगांत आहे, तें तें उपभोग्य आहे कीं नाहीं, आनदद्रायक आहे कीं नाहीं, मादक आहे कीं नाहीं आणि त्याच बरोबर तात्पुरतंच आहे ना, याची माणसानं खात्री करावी. आणि आयुष्याच्या अवधींत निरनिराळ्या दालनांत प्रवेश करावा. साऱ्यांत असून कशांतहि न सापडतां उपभोग घेण हीच माणसाची खरी हुशारी आहे. आणि तेंच मला करायच आहे. ही हुशारी म्हणजेच माणसाचं यश. जन्माला येऊन जें जें उपभोग्य, तें तें उपभोग्याच्या दृष्टीनच उपभोगण हेंच माणसाचं जीवितविषयक तत्वज्ञान. जगांत सगळ्या माणसांचं तत्वज्ञान हेंच असतं. सुमनन नाहीं का दुसरा नवरा केला ! दुसरा नाहीं तर काय ! दुसराच तो. आणि त्याच्याशीं समरस व्हायला.......समरस होणं हा एक या खेळांतला फसवा शब्द आहे. समरस व्हायच म्हणजे पहिलं सारं विसरुन पुन्हां कोऱ्या मनान दुसऱ्या वस्तूचा उपभोग घ्यायचा. पण उपभोग असा शब्द वापरला कीं आमच्या हिंदु मनाला तो वाकडा लागतो. असतो तो उपभोगच. पण त्याला म्हणायच समरस होण. त्याला म्हणायच मनाच मीलन होणं. त्याचं तिसरं नांव आहे दोघांच एक होणं. पण जीं एक होतात तींच पुन्हां दोन होतात. एकाचं व्यक्तीमत्व दुसऱ्या कोणांत विरघळून जात असं कांहीं कधींच होत नाहीं. सुतार जसे लाकडाचे तुकडे जोडून खुर्च्या, टेबलं, कपाटं करतो, तसंच हें आहे. ती एक खुर्ची म्हणजे अनेक लाकडांचे तुकडे असतात. ते एके ठिकाणीं ठाकून ठोकून जोडले, वरुन पॉलीश केलं, जरा चकचकीत रंग लावले कीं आपल्याला वाटतं, ही खुर्ची म्हणजे सलंग एक लाकूड आहे. पण सारं तसं नसतं. ते रंग निघाले, त्या जोडलेल्या लाकडांना कुठें धक्का बसला कीं ते ते तुकडे वेगळे होतात. आणि त्यांचं तें अनेकांचं एकपण एका-

एकीं नाहींस होऊन बसतं. तसं हें समरस होणं, शारीरिक आकर्षण, तारुण्याची मौज, शृंगाराची नवी नवलाई असते तोपर्यंत आपण समजतों कीं आपण दोघे म्हणजे एक पण ते एक नसतात. त्यांचं मीलन फक्त शारीरिक सुखोपभोगापुरतंच असत. त्यांच्या मनाची समरसता फक्त दोघांना एकमेकांची शारीरिक ओढ असते तोपर्यंतच असते. बाकी खरे म्हणजे ते दोन असतात. तसं नसतं तर सुमनन आपल्या नवऱ्याला एकदम चांगला टरवावा, त्याच्यावर एकदम प्रेम करू लागावं याला काय अर्थ आहे ? आणि मीसुद्धां थोडया अवधीनतर कां होईना, सुमित्राच्या सहवासात सुखाचा अनुभव घ्यावा याचा दुसरा अर्थ काय ?

छे ! सुमित्रा हा आपल्या आयुष्यांतल्या नाटकातला दुसरा प्रवेश आहे. हें एक दुसर पात्र आहे. हा एक दुसरा अनुभव आहे. तिची आणि माझी ही दुसरी ओळख आहे. पण त्या ओळखीचं महत्व किती ? नवी ओळख होईपर्यंत. जास्त नाहीं.

पुन्हा मनाला जरा बर वाटल. आणि मी घरीं गेलों. सुमित्रेन दिलेले पदार्थ घेऊन ट्रिप केली. तिन म्हटल्याप्रमाणें सध्याकाळीं पांच वाजतां जिथे मी होतों तिथून तिला पत्र टाकल अगदीं सुदर पत्र लिहिल. आणि मी मुंबईहून पुण्यास परत आलों तेव्हां ती अगदीं खुश झाली. पावसाळ्याच्या दिवसांत घाट उतरून जाऊन मी सायकलवरून मुंबईला गेलों आणि पुन्हा पुण्यास परत आलों या माझ्या पराक्रमाचं तिला अतिशय कौतुक वाटलं. माझ्याकडे तिन प्रेमभरान पाहिलं. मी आल्याबरोबर तिला अस वाटलं कीं माझ्या गळ्याला घट्ट मिठी मारावी. आणि ती मिठी कधींच सोडूच नये. पण त्या दिवशीं मी मुद्दामच अगदीं स्थितप्रज्ञासारखा वागत होतों. मी तोंडान कांहीं म्हणालों, प्रेमाची कितीहि गोड गोड भाषणं केलीं तरी मधूनच मी फार अलिप्तपणानं वागत होतों. तो अलिप्तपणा, ती दूरत्वाची जाणीव, तिला खुपल्याशिवाय रहात नाहीं, मला हें समजत होतं. पण मला तसच वागायच होतं. पायांतली वहाण डोक्यावर घेऊन नाचण्याचा मूर्खपणा मला पुन्हां करायचा नव्हता.

ट्रिपला जाताना ती मला म्हणाली होती, ' तुम्ही काय मागाल तें मी देईन. माझ्याजवळ आहे तें सारं तुमचच आहे." त्या वचनाची तिला आठवण होती. मीहि तें कांहीं विसरलों नव्हतों. माझ्या मनांत असतं तर मीच तिला म्हणालों असतों, " जातांना मला काय म्हणाली होतीस ? काय वचन दिलं होतस ? त्याची आतां पूर्ती केली पाहिजे तुला. "

पण मी असं मुद्दामच म्हणालों नाहीं. पुरुषानं असं आपणहून म्हटलं कीं बायका फार चढून जातात त्यांना वाटतं कीं, आपल्यावाचून याचं अडून राहिलं आहे. आपल्यावर याचं फार प्रेम आहे. आपल्या इषाऱ्या-वर हा नाचत राहील. भारी हुरळून पण जातात त्या. त्याना आपल्या सौंदर्याचा आपल्या तारुण्याचा, आपल्या स्त्रीत्वाचा भलताच, फाजील अभिमान वाटूं लागतो. तिला सुख व्हावं म्हणून कांहीं मीं तिच्याशीं मैत्री ठेवली नाहीं. मी हें सारं माझ्या सुखासाठीं करीत होतो. आपल्या आयुष्यांत आपणहून समोर आलेली ही सुद्धा वस्तु उपभोग्य आहे एवढीच माझ्या मनांत तिला किंमत होती. पैशाला जेवढी मी किंमत देत होतों. तेवढी कांहीं स्त्रीला माझ्याजवळ किंमत नव्हती. आणि म्हणूनच मी तिला तसं कांहीं म्हणालों नाहीं. तिच्या भावनांना, विकाराना उत्तेजन दिलं नाहीं. मला जें तिच्यापासून हवं होतं तें मी तिच्याकडून घेणारच होतों. पण तिला मोठेपणा न देता; तिच्याजवळून उपभोग घ्यायचे आणि तिला तर असं वाटलं पाहिजे कीं आपल्यावर याचे केवढे उपकार आहेत ! मी माझ्याकडून उतावीळपणा दाखवायचा नाहीं असं माझं एकंदरीत ठरलं होतं. उतावीळपणाचा दोष तिच्याच माथीं मारून सौख्याचा वाटेकरी व्हायचं भाग्य मला हस्तगत करायचं होतं. म्हणून मी कांहींच म्हणालों नाहीं.

पण तिला आपल्या शब्दाची आठवण होती. शब्दाची कसली म्हणा, आपल्या सुखासाठीं ती उतावीळ झाली होती. म्हणून ती मला म्हणाली, " कशी झाली ट्रिप ? "

" छान झाली कीं, " एखाद्या तिऱ्हाईताला उत्तर द्यावं तसं मी म्हणालों.

" वाटेंत काय झालं तें सांगा ना. " तिनं आर्जवानं, मोठ्या कौतुकानं माझ्याकडे पहात विचारलं.

पण मी अगदीं कोरड्या शब्दांत म्हणालों, " वाटेंत काय व्हायचंय ! झाड, डोंगर, पर्वत, विजेच्या तारेचे खांब आणि आम्ही जात होतों तो रस्ता. हे लोक सारखे भेटत होते. तुम्ही आगगाडींतून जाता तसें आम्ही सायकलवरून जातों. विशेष कांहीं नाहीं. "

सुमित्रा थोडी खट्टू झाली थोडा वेळ गप्प बसली. मग पुन्हां तिनं मला पाझर फोडायचा प्रयत्न केला. " पत्र कस लिहिलंत तिथून ? "

" कस म्हणजे ? हातान, पेन्सिलीन नेहमीं लिहितों तसंच लिहिल. कां ? अक्षर वाईट आल होतं ? भाषा बदलली होती ? कीं निराळ्या लिपींत लिहिल होतं ? "

" तसं नव्हे " पुन्हां ती आजीजीनं बोलूं लागली, " तुमच्याबरोबर तुमचे मित्र होते. त्यांनीं विचारलं नाहीं तुम्हाला ? कीं कुणाला तुम्ही पत्र लिहिता ? काय लिहितां ? एकट चोरून काय लिहितो आहेस ? "

" अं ! मला कोण लेकाचा विचारतो आहे ? " असं म्हणून तिच्या प्रश्नाचं मीं उत्तरच दिलं नाहीं.

" फार दमलात का ? त्रास नाहीं ना झाला ? "

" छे ! त्रास कसला व्हायचा ? मी काहीं सायकलवरून दिल्लीला नव्हतों गेलों. मुंबईला तर जाऊन आलों. "

" बरं पण चहा घेणार का ? कां कॉफी करूं ? "

" कां बरं ? आज माझी फारशी काळजी लागली आहे ? "

" म्हणजे तुमची काळजी मी एरवीं कधी घेत नाही ना ? "

" घेतेस ना. पण आज मला फार वाटलं. "

" तुम्ही दमून आलां असाल म्हणून विचारलं मी तुम्हाला. असं हो काय करतां ? एखाद्या तुटक माणसासारखं कां बोलतां ? तुम्हांला राग आला माझा ? "

" तो काय म्हणून ? तूं काय माझं घोडं मारलं आहेस ? "

" मग माझं ऐका गडे. दमला नाहीं ना तुम्ही ? "

" छे! दमायला काय झालं ! "

" मग आपण अस करू या. "

" आपण सिनेमाला जाऊं या. घरांत बसून फार कंटाळा आला आहे " तिन आळस देत आपला कटाळा सिद्ध केला. मी कांहींच बोललों नाहीं. माझ्याकडे आर्जवान पहात माझ्याजवळ सरकून ती पुन्हां म्हणाली, " आपण सिनेमाला जाऊ या. बॉक्सचीं तिकिट काढू आपण आज "

" पण मी एकदम म्हणालों, " छे! आज नाहीं जमायचं. आज मी माझ्या एका मित्राबरोबर सिनेमाला जाणार आहें. त्याच्याबरोबर मला गेलंच पाहिजे."

" अस्स होय ! म्हणजे मित्राबरोबर सिनेमाला जाण्यात तुम्हाला अधिक सुख वाटत. माझ्यापेक्षा तो मित्र तुम्हांला आधिक जवळचा. माझ्या मनापेक्षां मित्राच्या मनाच समाधान अधिक महत्वाच. " ती रागाऊन थोडं दूर सरकून म्हणाली.

" तस नव्हे. कोणाच महत्व अधिक असा प्रश्न इथें उत्पन्न होत नाहीं. मला काय आधीं स्वप्न पडल होत कीं तुझ्याबरोबर मीं सिनेमाला यावं अशी तुझी इच्छा आहे म्हणून ! त्याची माझी पैज टरली होती. त्यान ती जिंकली. आतां मला त्याला सिनेमाला नेण भागच आहे. "

" कसली पैज टरली होती ! आणि मगाशीं विचारलं तेव्हां म्हणालात कीं वाटेंत कांहीं झाल नाहीं. मनात काहीं सांगायचच नसत. तुमचीं इच्छाच नाहीं माझ्याबरोबर येण्याची. मला वाटल, आपण म्हणालों कीं तुम्ही मुंबईहून सुखरूप परत आलांत तर मी तुम्हांला तुम्ही मागाल तें देईन. म्हणून मी म्हणालें आपण सिनेमाला जाऊ. बॉक्सचीं तिकिट काढू. "

" पण मीं कुठें तुझ्याकडे कांहीं मागितल होत ! उलट सिनेमाची मागणी तूंच चालवली आहेस. मीं तुझ्याकडे मागण्याऐवजीं तूच माझ्याकडे मागते आहेस. "

" हें खरं नाहीं. तुम्ही नका नेऊ सिनेमाला मला. मी नेईन तुम्हांला. पण तुम्ही मला नेण किंवा मी तुम्हांला नेणं यांत फरक वाटतो ना तुम्हाला !"

आपण दोघ एक आहोंत असं वाटत होतं मला. पण तुम्हाला नाहीं तसं वाटत. ”

“ असं मीं कधीं म्हटलं ? खरं म्हणजे मी कांहींच म्हणालों नाहीं. दोन कीं एक हें गणित कधीं मीं सोडवायला घेतलंच नाहीं. ”

“ मला तें कांहीं समजत नाहीं. मला एवढंच सांगा, मला सिनेमाला न्या असा हट्ट धरण्याचा माझा अधिकार नाहीं ना ? ”

“ आहे ना. माझ्या मित्राचा जर आहे तर तुझा का असणार नाहीं ? या जन्मात तुला मी सिनेमाला नेणार नाहीं असं म्हणालों का मी तुला ? मी एवढंच म्हणालों कीं मला आज यायला वेळ नाहीं. वाटल तर उद्या येईन. ”

एवढ म्हणालो आणि जायला उठलों. ती नाराज झाली होती. मी आलों तेव्हा तिचा चेहरा आनंदानें फुलून गेला होता. मला भेटण्यासाठीं ती फार आतुर झाली होती. तो उत्साह, ती उतावीळ तिच्या चेहऱ्यावर दिसून येत होती. पण आमच्या या संभाषणानंतर तिच्या चेहऱ्याचे सारे रंग पालटून गेले. ती भारी नाराज होऊन बसली. तासापूर्वीं ती उत्साहान फुलून गेली होती हें माझं मलासुद्धा खर वाटेना. माझ्या त्या बोलण्यानं तिच्या त्या उत्साहावर अगदीं विरजण पडलं. पण त्याला माझा नाईलाज होता. ती माझ्याशीं आज कशं वागेल याची मला आधींच कल्पना होती. आणि आपण तिच्याशीं असंच वागायचं होहि माझं अगदीं ठरून गेलं होतं. मित्राला सिनेमाला नेण्याची शुद्ध थाप होती. ती कांहीं म्हणाली तरी त्या वेळीं सुचेल ती थाप मारून तिला मोडून काढायची हें माझं आधींच ठरल होतं. आणि त्याप्रमाणें मीं केल. मी जायला निघालों. थोडयाशा रागानंच पण आपलेपणाच्या अधिकारानं तिन मला म्हटलं, “ दोन मिनिट वेळ आहे का ? मी चहा घेऊन येतें. ”

मीं म्हणालों “ नको. ”

“ मग खायला आणू का कांहीं ? ”

“ खरं म्हणजे आज मला भूकच नाहीं. ”

" आज काय माझं अगदीं क्षुल्लक म्हणणं सुद्धां ऐकायचं नाहीं असं ठरवून आलां आहात का ? "

" काय ऐकल नाहीं तुझ ? "

" नुसत खाऊन जा, चहा पिऊन जा म्हणते तेवढ कांहीं ऐकवत नाहीं तुमच्यानी. पण खरच सागते तुम्ही आज कांहीं न घेता गेलात तर मला फार वाईट वाटेल. आणि मी सुद्धा आज रात्रीं आता जेवणार नाहीं. माणसान एवढा जीव तोडून कांहीं विचाराव तर त्याची पर्वाच नाहीं तुम्हांला. चुकल का माझ काहीं ? "

सुमित्राचा सूर अगदीं रडवा झाला होता. सुमनपेक्षां हिचा स्वभाव थोडा ताठ होता म्हणून ऊठ सूठ ही कधीं डोळ्यांना पदर लावीत नसे. पण मनाची व्यथा तिच्या आर्जवातून व्यक्त होत होती. सुमनची आणि हिची पद्धत बेगळी असली तरी आर्जवशक्ति दोघींचीहि विलक्षण होती. मीं मनाचा एवढा निश्चय केला होता तरी अखेर अखेर मला वाटल कीं हिच्याबरोबर आपण सिनेमाला जाव हिच्या मनासारखं कराव. पण मीं माझं मन आवरल. जें ठरवल होत तें व्यवस्थितपणें पार पाडायला हवं होतं. तरी पण चहासाठीं थांबलों नी म्हणालों, " तुम्ही मुली फार हळव्या बुवा. बरं चल, चहा आण झटपट. "

आणि खरच तिनं दोन मिनिटांत चहा करुन आणला. फारशी कांहीं खुश झाली नाहीं ती माझ्यावर. कशी होणार ? बॉक्सची तिकिट काढून माझ्याबरोबर सिनेमाला येण्याचा तिचा बेत होता. आणि तो मीं असा उधळून लावला. ज्या सुखाच्या अपेक्षेनं ती आज माझ्याकडे पहात होती तें सुख समोर असून डोळ्यांदेखत चालतं होत होतं. ती नाखुश झाली. नाखुषीनेंच मला दारापर्यंत पोंचवायला आली व म्हणाली " आतां कधीं येणार ? "

मी जरा नरम सुरांत म्हणालों " तूं म्हणशील तेव्हां. उद्यां येऊं ? "

" हो या. किती वाजतां याल ? "

" तूं म्हणशील तेव्हां. उद्यां आपण सिनेमाला जाऊं. " तिचा चेहरा एकाएकीं आनंदी होण्याएवढी ती मूर्ख नव्हती. चेहरा बदलला. पण ती

आश्चर्यानं मूढ होऊन गेली. जो गृहस्थ अर्ध्या तासापूर्वी एवढा तोडून बोलला, तोच गृहस्थ " तू म्हणशील तेव्हां येईन. आपण सिनेमाला जाऊ." ही भाषा बोलतो तरी कसा, असं तिला वाटलं असल्यास त्यांत मुळींच नवल नव्हतं. पण आपल्या आश्चर्याला मात्र तिनं शब्दांचं रूप दिलं नाहीं. आश्चर्याचे भाव तिनं आंतल्या आंत गिळून टाकले. चेहरा तिनं नेहमींसारखा केला. आणि नुसतं म्हणाली " बरं या. मी वाट पहातें तुमची."

मला वाटतं तिला वाटलं असेल कीं, आपण आपलं आश्चर्य बोलून दाखवलं आणि तेवढ्यानंच यांची मर्जी गेली तर उद्यांच्या बेतावरहि पाणी पडायचं. म्हणून आपलं आश्चर्य तिनं प्रगट केलं नाहीं.

मी हसतमुखानं तिचा निरोप घेऊन निघालों आणि जातां जातां माझ्या मनांत आलं किती स्वाभिमान शून्य आहे ही ! हिच्या जागीं मी असतों तर ! असल्या लहरी माणसाचा मला खरंच राग आला असता. आणि त्याच्या लहरीपणाचा जाब मीं त्याला त्याच्या तोंडावर विचारला असता. पण सुमित्रेनं तें कांहीं केलं नाहीं. माझ्या लहरीपुढें तिच्या आर्जवशक्तीची मात्रा चालत नव्हती. आजचा डाव मीं जिंकला होता. प्रत्यक्ष बोलून दाखवलं नाहीं तरी सुमित्रा मला कृतीनं शरण आली होती. मला फक्त एवढंच हवं होतं. आज मीं माझ्या मनासारखं केलं होतं. खेळणं आज मला दूर फेकून द्यायचं होतं. उद्या मी तें जवळ घेणार होतों. आणि तें मला आज शंभर टक्के जमलं होतं. खेळाचं तंत्र एकंदरीत मला अवगत होत होतं. माझा मीच माझ्यावर खुश झालों. आणि शीळ घालीत मीं घरांत पाऊल टाकलं.

— —

# ६

दुसऱ्या दिवशीं मी सुमित्रेकडे गेलों. एका इंग्रजी चित्रपटाला जाण्याचा माझा विचार होता चित्रपट दुपारीं सव्वातीनला होता. तिकिट मीं सकाळींच रिझर्व करून ठेविली होती. सुमित्रेला बरोबर घेऊन गेल्यावर तिकीट काढण्यांत मला वेळ घालवायचा नव्हता. शिवाय तिकिट बॉक्सचीं काढायचीं होतीं. पैसे किती खर्च होणार याची मला परवा नव्हती. आज मीं सुमित्रेला खुश करायच ठरवलं होतं. तीनला सात आठ मिनिट कमी असतांनाच मी तिच्या घरापर्यंत आलों होतों. तिची आई काय म्हणेल, तिला माझ्याबरोबर पाठवील किंवा नाहीं याची मला शकाच होती. पण मी पहातों तों सुमित्रा कपडे घालून तयारच दिसली. गॅलरींत उभी राहून माझी वाटच पहात होती. ती निळ पातळ नेसली होती आणि तसलाच ब्लाऊझ तिन अंगात घातला होता. सिनेमाला माझ्याबरोबर जायचं आहे या एवढया कल्पनेनच तिच्या मनच्या पाकळ्या फुलून गेल्या होत्या. माझी वाट पहात ती उभी होती. मला पहाताच ती दार उघडायला आली. मी बाहेर जिन्याच्या शेवटच्या पायऱ्या चढत होतों, तेंव्हाच मला तिच्या गाण्याची गुणगुण ऐकू आली. “ नाहीं मी बोलत नाथा, नाहीं मी बोलत नाथा. ” मला हसू आल. ती ओळ, ओळीचा अर्थ, आणि सुमित्रेचा आवाज या साऱ्या गोष्टी मला आवडल्या होत्या. ऐकाव्याशा वाटत होत्या. एकदम कसला तरी मधुर सुवास दुरून यावा आणि त्याच सुख व्हाव तसं वाटल मला. ‘ नाहीं मी बोलत नाथा ’ ही ओळ सुमित्रेनं म्हटलेली आपण ऐकावी, पुन्हां पुन्हां ऐकावी असं वाटलं. दाराच्या बाहेरच क्षणभर उभा राहिलों.

पण दुसऱ्याच क्षणीं दरवाजा उघडला गेला. दोन्ही दारं उघडून तिनं थोडंसं बाहेर डोकावल्यासारखं केलं. तों मी अगदीं समोरच उभा. अगदीं जवळच उभा. मी दरवाज्यापर्यंत येऊन उभा असेन याची तिला कल्पना

नव्हती. मी दाराशीं येऊन पोंचण्यापूर्वीच दार उघडावं ही तिची मनीषा. त्यामुळेंच ती मोकळेपणान म्हणत होती, " नाहीं मी बोलत नाथा. "

आणि तें मीं ऐकल. तिच्यासमोरच उभ राहून ऐकलं. मी हसलों; आणि ती एकदम लाजली. मी म्हणालों, " कोणचं गाण म्हणत होतीस ?"

" इश्श् ! "

" इश्श् काय ? इश्श हें गाणं म्हणत होतीस ? "

" म्हणत होतें आपलं असंच नाटकातलं गाणं. "

" आज बोलणार नाहीं वाटत आमच्याशीं. " मी म्हणालों.

" न बोलायला काय झाल ? "

" आता तर तू म्हणत होतीस, नाहीं मी बोलत नाथा. "

" इश्श् ! तुम्हाला नाहीं काहीं तें. काहींतरीच बोलू नका. दारांतच का उभ रहायच आहे ? आत या ना. "

मी आत आलों. म्हणालो, " किती वाजले तें माहीत आहे ना ? परवानगी काढली का ? "

" हो काढली. "

" कोणी काहीं हरकत घेतली नाहीं ? "

" नाहीं. त्याना कल्पना आहे सगळी. आणि त्याचा विरोध नाहीं मला. "

" कसली कल्पना ? आज हें तू काय नवच बोलते आहेस ? "

" नवं नाहीं अन् जुनं नाहीं. आत्ता नाहीं सांगत. मग सांगेन सगळं. आधीं जाऊ या आपण. सिनेमा किती वाजता आहे ? "

" सव्वा तीनला. "

" मग जाऊं या आपण. उशीर नको व्हायला. "

असं ती म्हणाली आणि आम्ही जायला निघालों. जिना उतरताना तिच्या लुसलुशीत बोटांत मीं माझी बोट अडकवलीं होतीं. अगदीं एका चालींत आम्ही जिना उतरत होतों. क्षणभर असं वाटलं कीं तिच्या पायांनीं मी चालतों आहें आणि ती माझ्या पायांनीं चालतें आहे. दुसऱ्या क्षणीं तर आम्हीं चालतों आहोंत हें सुद्धां आम्ही विसरून गेलों. पुढें

मिळणाऱ्या निवान्त सहवासाच्या सुखाच्या कल्पनेन आमच्या व्यक्तीमत्वाचा एकमेकांच्या व्यक्तीमत्वात एवढा लय झाला होता की वास्तव जगाचा जणु आम्हांला विसर पडला. भर दिवसा, इतके लोक ज्या वाड्यांत रहातात त्या वाड्याच्या जिन्यातून एकमेकांना बिलगून चालण बर नाहीं एवढ्या साध्या गोष्टीचा, माझ्यासारख्या आता सावध माणसालासुद्धा विसर पडला. हा प्रभाव आमच्या त्या तारुण्याचा होता. हा विसर आमच्या त्या तरुण सुलभ मनान पाडला. आम्ही क्षणमात्र जगाला विसरलों, आणि एकमेकांना बिलगून एका चालींत जिना उतरू लागलों.

पण जग आम्हाला कुठें विसरल होतं ? दुसरा जिना अर्धा उतरतों न उतरतों तों काखेत वर्तमानपत्राची गुडाळी घेतलेला, अंगाला कोटाच कापड लपेटलेला, मलीन चेहऱ्याचा, चांदीच्या काड्यांचा चष्मा डोळ्याला लावलेला, असा एक उंचाडा, किडकिडीत माणूस, भिंगाच्यावरून पहात पहात तिरका तिरका जिना चढत वर आला. आणि कांहींहि कारण नसतांना त्यान मला धक्का दिला. आणि वर ' सॅारी ' म्हणून मोकळा झाला. मी जागा झालों. आणि सुमित्रा शुद्धीवर आली माझा हात तिनं सोडून दिला. आणि पुढच्या पायऱ्या ती एखाद्या तिऱ्हाइत माणसासारखी उतरू लागली. जसा काहीं मी तिच्या बरोबर नव्हतों, आणि तिची माझी ओळखसुद्धां नव्हती.

आम्ही खालीं आलों तेव्हां सुमित्रानं सहज वर पाहिल, आणि मला डोळ्यानं खुणावून ती म्हणाली, " वर पाहिलत का ? "

" काय आहे वर ? "

" आत्तां जिन्यांत उभा असलेला तो माणूस गॅलरींत उभा राहून पहातो आहे. असा काय पहात होता हो तो मगाशीं आपल्याकडे ? "

" त्याला हेवा वाटत होता आपला. "

" तो काय म्हणून ? "

" त्याच्या आयुष्यांत या सुखाचा अनुभव त्याला मिळाला नसेल. ज्यांना हें सुख मिळत नाहीं ते असेच पहातात इतरांच्याकडे. मनांतून ते जळत असतात. या सुखाला पारखे झाल्यामुळें आंतून तडफडत असतात.

म्हणून दुसऱ्याचा तिरस्कार करतात. आणि आपल्याला सोवळे, नीतिमान म्हणवून घेण्याची खटपट करतात. ''

बोलता बोलतां आम्ही चौकांत आलों. सुमित्रा अजूनहि मागें वळून पहात होती मी म्हणालों, '' अजून काय मागें पहाते आहेस ? ''

'' तो समध येतोय का पहातें. ''

'' वेडीच आहेस. तो कशाला मागें येतोय ? आणि मी आहे ना बरोबर ? मी असल्यावर भीति कशाची वाटते आहे तुला ? मागल्या भीतीन मागें वळून पाहतां पाहता पुढचा रस्ता पहायच तूं विसरतेस आणि पुढचे धोके तुला समजत नाहीं. ''

'' मग काय करू ? ''

मी तिचा हात धरून तिला ओढीत म्हणालों, '' मी तुला नेईन तिकडे चल. विचार करूं नकोस. ''

'' बरं. ''

मीं एक टॅक्सी बोलावली. आणि आम्हीं दोघ गाडींत बसलों. गाडी सुरू झाली. सुमित्रा गाडींत मला अगदीं बिलगून बसली होती. कांहीं बोलत नव्हती. एखाद्या भारून गेलेल्या माणसासारखी तिची अवस्था झाली होती. मी म्हणालों '' काय पहातेस ? ''

खालीं पहात ती म्हणाली '' कांहीं नाहीं. ''

'' बोल ना. ''

'' काय बोलू ? बोलावसं नाहीं वाटत. ''

'' मग काय वाटतं ? ''

'' तें नाहीं मला सांगतां येत. ''

'' जिन्यांतल्या त्या बुड्ढ्याचा विचार करतेस ? ''

'' शी ! त्याची नको आठवण आत्तां. '' ती पुन्हां गप्प बसली. मीही कांहीं बोललो नाहीं. एक हात मीं तिच्या पाठीवरून मागें सोडला होता आणि दुसरा हात मीं तिच्या हातांत गुंतवला होता. मनाला मोठं सुख होत होतं.

गाडी कॅपात थिएटरपाशीं थांबतांच आम्ही खालीं उतरलों. तिकिटं काढलेलींच होतीं. त्यामुळें तिकिट ऑफीसपाशीं थांबायचा प्रश्न व नव्हता. पण चित्र पहात मी उभा होतों. इंग्रजी सिनेमा होता. उत्तान चित्रांची नुसती परेड लागली होती. उन्मादाच अगदीं उघड उघड प्रदर्शन होतं तें. माझ्या कोटाची बाही ओढीत ती म्हणाली, " आत जाऊं या. इथें नको उभं रहायला. "

" का ? "

" आणखी कुणी तरी भेटायचं. "

मी " बरं " म्हणून निघालों तों समोरून तिची मैत्रीण हसत खिदळत येताना दिसली. " अय्या ! सुमित्रा, तू इकडे कोणीकडे ? "

माझ्याकडे चमत्कारिक नजरेनं पहात हातातली लाल रंगाची ती भडक पर्स या हातातून त्या हातात नाचवीत तिनं विचारलं. आपण फार अल्लड आणि फुलासारख्या निष्पाप आहोंत असं दाखवायचा तिचा प्रयत्न होता. तरुणी होऊन लहान मुलीसारखं वागायची कित्येकींना हौस असते. मनातल्या मनात मीं तिला मूर्ख असा शेरा मारला.

सुमित्रेनं तिच्या प्रश्नाला उत्तर दिलं नाहीं आणि तिला प्रश्न केला, " तू सिनेमाला आलीस वाटतं ? "

" हो. हा माझा भाऊ. रमेशदादा. "

" असं होय ? " असं म्हणून सुमित्रेनं तिच्या त्या रमेशदादाला नमस्कार केला. मी आपला थोड्या अंतरावर तिसरीकडेच पहात बेफिकीर-पणानं उभा होतों. मला तीं माणसच आवडलीं नाहींत. पण ती बया हावरी होती. आपला काडीसारखा हात नाचवीत, आपल्या खप्पड चेहऱ्याची मान उचावीत तिनं सुमित्रेला प्रश्न केला, " हे कोण बरोबर ? ओळख करून नाहीं दिलीस ती ? "

" माझे मित्र आहेत ते प्रभाकर... "

" अस्सं अस्सं ! " असं म्हणत ती आपल्या रमेशदादाबरोबर निघून गेली. गेली तरी परतून माझ्याकडे पहात होती. " पाहिलंत ? "

" काय ? "

" हें असं कोणी वाटेंत भेटलेलं मला आवडत नाहीं. "

" कां ? "

" कां काय ? उगीच चर्चा नको. चित्र पहात उभं रहायचं नाहीं. जाऊं या आपण. "

" अग हे नेहमीं असंच होतं. नको असलेल्या गोष्टीच फार घडतात. ज्या वेळीं आपल्याला कोणीं भेटायला नको असेल तेव्हां हटकून माणसं भेटतात. "

आम्ही बोलत बोलत एव्हाना बॉक्सपर्यंत आलों होतों. जागा दाखवणारानं आम्ही आंत गेल्याबरोबर बॉक्सचा पडदा ओढून घेतला. आणि सिनेमाची वेळ झालेली असल्यामुळें थिएटरांत अंधार झाला. पडद्यावर जाहिराती सुरू झाल्या. आम्ही आमच्या जाग्यावर बसलों होतों. माझी खुर्ची मीं सुमित्राच्या खुर्चीजवळ ओढून घेतली. समोर डोकावून पाहिलं तों आमच्या समोरच्या तीनचार रांगा रिकाम्याच होत्या. सुमित्रा म्हणाली, " कोण आहे ? "

" कोणी नाहीं. "

मीं तिचा हात हातांत घेतला. तो किंचित थरथरत होता. मला वाटतं तिची छाती धडधडत होती. भीतीनं नव्हे. पण अंधार झाला होता. आणि भोंवतालीं माणसं असलीं तरी एक प्रकारचा एकान्त आम्हाला मिळाला होता. असा हा एकान्त आम्ही प्रथमच अनुभवीत होतो. समोरच्या पडद्यावरचा प्रकाश आमच्यापर्यंत येऊन अंधुक झाला होता. पण तेवढ्या त्या प्रकाशांत आम्ही एकमेकांना दिसत होतों. तिची हनुवटी वर उचलीत मी म्हणालों " सुंदर दिसतेस. "

सुमित्रेनं मान आणखीच खालीं केली. मी सारखा तिच्याकडे पहात होतों. तिच्या हातावरून, पातळावरून हात फिरवीत होतों. मी तिच्या कानाशीं तोंड नेत अगदीं हळू म्हणालों " हें पातळ तुला सुंदर दिसतं. "

" खरंच ? " डोळ्यांच्या पापण्या वर सरकवीत तिनं विचारलं. माझ्या गळ्यांत आपले हात घालून, माझ्या दृष्टींत आपली दृष्टि मिसळून ती म्हणाली " मी आवडतें तुम्हांला ? "

" हो. खरंच आवडतेस. थाब. पाठ कर माझ्याकडे. " आणि मी माझ्या खिशांतून मोगरीच्या कळीची सुंदर, नाजुक वेणी काढली. आणि तिच्या केसात अडकवून मी म्हणालों " वेणी छान दिसते तुला. "

आणि आपल्या केसात आर्धीच खोवलेल गुलाबाचं फूल तिनं माझ्या कोटाच्या बटनहोलमध्यें अडकवीत म्हटल " कसं दिसतं आहे ? "

मी नुसता हसलों. तिच्या गालावर हळूंच ओठ टेकले. तिला हृदयाशीं आवळून धरली. आणि तिच्या त्या सुकुमार पातळ ओठांचं मीं चुंबन घेतलं, समाधानानं तिनं डोळे मिटले. आणि माझ्या खांद्यावर मान टेकली. माझ्या छातीवरून हात फिरवीत राहिली. सगळा सकोच आतां दूर झाला होता. शृंगार सुलभ लज्जा वाटत होती. तेव्हा ती भारी सुखाऊन गेली होती. जगाला विसरली होती. स्वत:ला विसरली होती. आणि माझ्या निकट सहवासाचं सौख्य ती बेभानपणान उपभोगीत होती. आपण सिनेमा पहायला आलों आहोंत याचीसुद्धा तिला विस्मृति झाली होती.

माझीसुद्धां अवस्था जवळ जवळ तशीच झाली होती. स्पर्शसुखाच्या राशींत मी सुखावून गेलों होतों. पण तरी भानावर होतों. त्या सौख्यांत भर घालणारी दृश्यं सिनेमांत समोर दिसत होतीं. तिकडेसुद्धां सुमित्रा पहात नव्हती. आम्ही नाहींतरी सिनेमा पहायला थोडेंच आलों होतों ! आलिंगन आणि चुंबनाचा सीन आला कीं मी तिला तो दाखवीत होतों. जणुं काहीं तो प्रश्नच मी तिला करीत होतों आणि त्याचं उत्तर म्हणून ती मला मिठी मारीत होती.

सबंध सिनेमांत आम्ही फक्त एवढीं दोन प्रकारचींच दृश्यं पाहिलीं. मध्यंतर आला तेव्हां आम्ही साळसूदासारखे बाजूला सरकून बसलों. दोन ग्लास सरबत घेतलं. आणि अर्धा अर्धा ग्लास पिऊन झाल्यावर मी तिला म्हणालों, " सरबत कसं आहे ? "

" छान आहे. " आणि तिनं आणखी एक घोट घेतला. मी म्हणालों, " हें जास्त गोड आहे. माझा ग्लास तूं घे आणि तुझा मला दे. "

माझा ग्लास आपल्या ओठांना लावीत ती म्हणाली, " खरंच, हें जास्त गोड आहे. "

" हें सुद्धां " असं मी म्हणालों आणि आम्ही एकमेकाकडे पाहून हंसलों. तेवढ्यात सिनेमाच मध्यन्तर संपलं. पुन्हां काळोख झाला. ग्लास-वाला ग्लास घेऊन गेला. पडद्यावर जाहिराती सुरू झाल्या. आणि आम्ही पुन्हा सगळ्या जगाला विसरलों. स्वत:ला विसरलों. पण या वेळीं आता वेळ संपणार याची जाणीव होती. दर दहा मिनिटाला सुमित्रा विचारी " किती वाजले ? "

पधरा मिनिटच उरलीं, तेव्हा सुमित्राच्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलं. आपण दूर होणार याचं तिला दुःख होत होत. " आता पुन्हा कधीं येऊ आपण जवळ ? "

तिच्या वेदना तिच्या स्वरांतून व्यक्त होत होत्या. उत्तरादाखल मीं तिचे अश्रु पुसले. " मी तरी काय सांगणार आपण कधीं जवळ येऊ तें ?"

आणि काय असेल तें असो. असा प्रश्न करून तिनं पुढची ग्वाही मागावी हें मला आवडल नाहीं. हातांत असलेली घडी उपभोगायची एवढंच माझं ध्येय होत. सिनेमा संपला तसे आम्ही बाहेर आलों. माझ्या वृत्तींत फारसा फरक पडला नव्हता. पण सुमित्रा भारी खिन्न दिसूं लागली. विरहाच्या कल्पनेनं तिच्या मनावर उदासीनतेची छाया पसरली. मघाशीं घरून निघताना जो उत्साह तिच्या चेहऱ्यावर चालण्या बोलण्यांत दिसत होता तो अगदीं मावळून गेला. ती म्हणाली " आपण बंडगार्डनवर जाऊन बसूं या थोडावेळ. मग घरीं जाऊ या. "

मी " बर " म्हणालों आणि आम्ही बंडगार्डनच्या एका झाडाखालीं जाऊन बसलों. जमिनीवर रेघोट्या काढीत ती विचार करीत होती. कांहीं तरी महत्वाचा विचार तिच्या मनांत घोळत होता. कांहीं तरी बोलण्यासाठीं शब्द जिभेच्या टोकावर येत होते. आणि तिथूनच ते परतत होते. तिचा निश्चय होत नव्हता कीं धीर होत नव्हता कोण जाणे ! पण थोडा वेळ नुसत्या स्तब्धतेंत गेला. मी नुसती तिची अस्थीर वृत्ती पहात होतों. कांहीं बोललो नाहीं. ती काय बोलणार याची मला हळू हळू कल्पना येऊं लागली होती. पण मला कोणत्याहि प्रकारचा गंभीर विषय नको होता. जें तिच्या मनांत घोळत होतं तेंच मला टाळायचं होतं. मी खिशी , ती

वृत्ती चाळवली नाहीं. तिला उत्तेजन दिल नाहीं कीं तिचा विचारभंगहि केला नाहीं. आलिप्तपणान तिच्याकडे पाहू लागलों. मगाशीं जेवढे आम्ही जवळ आलों होतों तेवढे आतां दूर गेल्यासारख वाटू लागलं. तिच्या मनांत घोळत असलेल्या विचारांची मला चाहूल लागली होती. आणि ते विचार तिन करावेत हे मला आवडत नव्हत.

पण माझ्या मनातला हा पालट त्या वेडया मुलीच्या लक्षांत आला नाहीं. आणि कसा यावा ? थोडया वेळापूर्वी ज्या तरुणाच्या खांद्यावर आपण विश्वासान मान टाकली, आणि ज्यान आपल्या हातान केसांत वेणी गुफली, सरबताच्या ग्लासाची ज्यान अदलाबदल केली तो प्रेमळ तरुण आपल्या विचाराची उपेक्षा करीत असेल, आपल्याकडे इतक्या तिऱ्हाइत नजरेन पहात असेल याची कल्पना तिला कुठून येणार ? तिच्या डोळ्यासमोर मगाचेच प्रसग सरकून जात होते. अजून त्याच त्या मादक वातावरणाची धुदी तिची उतरली नव्हती. माझ्याकडे पहात अखेर मनाचा निश्चय करून ती म्हणाली " एक विचारायच आहे तुम्हाला."

" काय "

" वास्तविक तुम्हीच मला विचारायचं. जें मी आत्तां तुम्हाला विचारणार आहे ती गोष्ट आज ना उद्यां तुम्ही मला विचाराल अशी वाट मी पहात होतें. पण वाट तरी किती पहायची ? म्हणून आतां मी ठरवलं कीं आपणच विचारायचं."

" काय ? "

" अस हे किती दिवस चालायचं आहे ? "

अगदीं बरोबर हाच प्रश्न मला सुमननं केला होता. असं वाटल कीं सुमित्रेच्या मुखान सुमनच बोलते आहे. मी स्वतःला सावरल. म्हणालों " अस म्हणजे कस ? "

" हें चोरून भेटण, कायम विरहांत रहाणं आणि कोणी पाहील कीं काय, कोणी विचारील कीं काय या भीतीन अर्ध मेल होण या गोष्टींचा मला आतां कंटाळा आला आहे. "

" मला वाटत आपण भेटणं बंद करूं या मग."

" हा काय उपाय आहे त्या वरचा ? " ती माझ्याकडे खोट्या रागानं पहात म्हणाली. तिला वाटलं मीं विनोद केला. अजूनहि माझ्याकडे पाहण्याची तिची भावना आपलेपणाची, किंबहुना नवरा बायकोच्या नात्याची होती. त्या हक्कान ती माझ्याकडे पहात होती. आणि वागत होती. मी विचारलं " मग कोणचा आहे ? "

" आपण लग्न करूं या. हा चोरटेपणा नको. कायदेशीर असाव सारं कांहीं. तुमची प्रेयसी म्हणून चोरून भेटण्यापेक्षां व लोकांच्या चेष्टेचा विषय होण्यापेक्षां तुमची पत्नी म्हणून उघड उघड मिरवण्यांत आणि अभिमानाचा विषय होण्यांत मला धन्यता वाटेल. कधीं करायचं लग्न ? "

" लग्न ? "

" हो. तुम्हांला अवघड काय वाटल त्यांत ? माझ्या घरच्या वडील माणसांची परवानगी आहे मला. तुम्हाला काय वाटलं कीं माझे आई-वडील विरोध करतील आपल्या लग्नाला ? तसे नाहींत बर का ते. फार समंजस आहेत ते. माझ सुख तेंच त्याचं सुख अस समजतात ते. आईनच मला काल रात्रीं विचारल. "

" काय विचारल ? "

" तें निराळ कशाला सागायला पाहिजे ?" ती म्हणाली, " प्रभाकरवर तुझं प्रेम आहे का ? आम्हांला जावई पसत आहे. मी विचारू का प्रभाकरनां ? "

" मग तू काय सांगितलस ? "

" मी काय सांगेन याची तुम्हांला कल्पना नाहीं ना ? तुमचं जें उत्तर तेंच माझ उत्तर "

" माझं उत्तर तुला माहीत आहे ? "

" नसायला काय झाल ? जीं माणस मनान एक असतात त्यांचीं उत्तरं एकच असायचीं. माझ्यावर प्रेम नाहीं तुमचं ? "

" कुणास ठाऊक ! " मी म्हणालों.

" माझ्याशीं लग्न करायची इच्छा नाहीं तुमची ? "

" तसं मला कांहींच सांगता येत नाहीं सुमित्रा. "

" म्हणजे काय प्रभाकर ! माझी थट्टा करतां तुम्ही ! आपण इतके हिंडलों, फिरलों, जवळ आलों, एकमेकासाठीं झुरलों, तळमळलों, आणि इतकं सगळं झाल्यावर आपण लग्न नाहीं करायचं ! माझ्यावर तुमचं प्रेम आहे कीं नाहीं हें माहीत नाहीं तुम्हाला ! माझ्याशीं तुमची लग्न करण्याची इच्छा नाहीं ! "

" हें पहा, प्रश्नाचा मारा करून मला भडावून सोडू नकोस. मला थोडा विचार केला पाहिजे. आजपर्यंत या गोष्टीचा विचारच मीं केला नव्हता. विचार केल्याशिवाय तुझ्या प्रश्नाचं उत्तर मला देतां यायचं नाहीं. "

थोडा वेळ कोणीच कांहीं बोललों नाहीं. खरं म्हणजे मी तिला लगेच " लग्नाची गोष्ट माझ्या हातून होणार नाहीं " असं सांगणार होतों. पण आम्ही नुकतेच सिनेमा पाहून आलों होतों. माझ्या जवळ येण्याची तिची ती धडपड एकदम कशी मोडून काढावी हें मला समजत नव्हतं. म्हणून मी तिला स्पष्ट असं कांहींच उत्तर दिलं नाहीं. काय करावं ! आत्तांच सांगावं कीं कालान्तरानं सांगाव याचा मी विचार करीत होतों. असं वाटलं कीं आत्तांच हिचा उत्साह भंग करू नये. पण ती फार अस्वस्थ झाली होती. मी तिच्याशीं लग्न करणार आहें हें गृहीत धरून, याची खात्री बाळगूनच ती माझ्याबरोबर सिनेमाला आली होती. माझ्याबरोबर फिरायला आली होती. मी असं कांहीं बोलेन याची तिला कल्पना नव्हती. पण मी प्रत्यक्षच जेव्हां असं म्हणालों तेव्हां ती फार बेचैन झाली. खरं म्हणजे माझ्याकडून तिला लगेच उत्तर हवं होतं. मलाहि या नाटकाचा प्रवेश संपवायला फारसं कांहीं वाटणार नव्हतं. पण मीं आपणहून ती कठोरता स्वीकारली नाहीं खरी. मात्र हिला नकार द्यायचा ही गोष्ट माझ्या मनांत अगदीं स्वच्छ, स्पष्ट होती. जी गोष्ट, ज्याला आम्ही प्रेम म्हणतों, ती गोष्ट केवळ मृगजळ आहे हें मला अनुभवानं पक्क माहीत होतं. तें मृगजळ आपणहून समोर आलं तरी मला तें नको होतं. प्रेम ही चीज किती फसवी असते याचा अनुभव घेऊनहि अखेर आपण प्रेमविवाह केला हा कलंक मला नको होता. दुसरी गोष्ट अशी कीं आत्तां, क्षणभर

ईहिला वाईट वाटेल, मनःस्ताप होईल, पण मग पुन्हां ही आपल्या वळणा-वर जाईल. कुणाशीं तरी सुमन सारखंच लग्न करील. आणि मागल्या गोष्टी जशा मी विसरलों तशा तीहि विसरेल. क्षणभर तिला दुःख होऊं नये म्हणून मी मला नको असलेली गोष्ट जन्माची लादून घेऊं कीं काय ! क्षणभर नाहीं तर काय ! आयुष्याच्या दृष्टीन विचार केला तर हें होणारं दु.ख क्षणभरच होय. सुमननं मला फसवल तेव्हाच मीं ठरवून टाकलं होतं कीं आयुष्य उपभोगायचं. स्त्रीकडे केवळ एक उपभोग्य वस्तु म्हणूनच पहायचं. खेळण्यासारखीच तिला जवळ करायची किंवा ढकलून द्यायची. आणि मला जो मनःस्ताप सोसावा लागला तो ताप एखाद्या तरी मुलीच्या कपाळावर आपण लिहून ठेवायचा. थोडे दिवस तरी या अपेक्षाभंगाचं, प्रेमभंगाचं दुःख मुलीच्या जातीला भोगायला लावलंच पाहिजे. योगायोगानं सुमित्रा माझ्या आयुष्यांत आली; आली तशी निघून गेली पाहिजे. गेली नाहीं, मला जास्त त्रास देऊं लागली तर मी तिला घालवून देईन. माझं आयुष्य, ही माझ्या हक्काची गोष्ट होती. त्यांत वाटेल त्यानं गर्दी करावी हें मला मुळींच पसन्त नव्हतं. आयुष्यांतल्या सर्व घटनेकडे तात्पुरतं म्हणून पहायचं हें माझं आता निश्चित होतं. सुमित्रा मला नकोशी झाली होती असं नाहीं. माझ्या आयुष्यांत ती आणखी राहिली असती तरी मला चालली असती. तिचा पाहुणचार मीं आणखी कांही दिवस केला असता. पण प्रेम आणि लग्न यांची मूर्ख बडबड सुरू करून माझ्या आयुष्यावर . . . . . . जेव्हां तिची मजल आली, तेव्हां मी विचार करूं लागलों कीं या प्रकरणाला आता केव्हां तरी विराम दिला पाहिजे. फक्त केव्हां द्यायचा ! आज ! उद्यां ! परवां !

मी विचार करीत होतों. मनांतल्या मनांत एक मूर्ख मुलगी म्हणून तिच्याकडे पहात होतों. पण तिला चैन पडत नव्हतं. थोड्या वेळानं ती मला पुन्हां म्हणाली, " चार दिवसांनीं विचार करून जें सांगणार तेंच आज सांगा. मरण उद्यांवर ढकलेलं सहन करण्यापेक्षां मला आजच मरूं द्या. खरंच सांगा, आपण इतके दिवस एकमेकांच्या सहवासांत घालवले, पतिपत्नी या नात्यांतच जो निकट संबंध शोभेल तो आपण ठेवला.

एकमेकांच्या भेटीसाठीं झुरलों. आणि एवढं होऊनहि तुम्हांला वाटत नाहीं कीं आपलं सुमित्रेवर प्रेम आहे ? ”

“ नाहीं वाटत. ”

“ कां नाहीं वाटत ? मग या साऱ्या गोष्टी तुम्ही माझ्याशीं कां केल्यात ? हे निकटचे संबध कोणत्या नात्यांत असतात तें माहीत नाहीं तुम्हांला ? खरच प्रभाकर, अशा पध्दतीन वागूनहि तुम्ही माझ्यावर प्रेम केलं नाहींत ? ”

“ नाहीं केल. प्रेम या शब्दावर, आणि प्रेमाच्या भावनेचा तू जो अर्थ समजतेस, तसल्या भावनेवर माझा मुळींच विश्वास नाहीं. ”

“ खोटं बोलतां तुम्ही माझ्याशीं जर लग्न करायचं नव्हत तर तुम्ही माझ्या इतके जवळ कां आलात ? ”

“ तू येऊ दिलस म्हणून ”

“ म्हणजे ! तरुण मुलगी म्हणजे तुम्ही काय खेळण समजतां ? नुसती मौज समजता ? ”

“ तुला राग येईल सुमित्रा, पण तरुण स्त्रीकडेच काय, पण तिच्या सबंध आयुष्याकडे मी एक खेळण म्हणून पहातों. तात्पुरत म्हणून पहातों, मौज म्हणून पहातों. यापेक्षां गभीरपणान मी कधींच पहात नाहीं. ”

“ पण तुमचा हा दृष्टीकोन तुम्ही मला आधीं कां नाहीं सांगितलात ? ”

“ तूं विचारला होतास का कधीं ? अशा कांहीं विषयावर बोलण्यापेक्षा आपण दोघं एक आहोंत या तुझ्याच समजुतीवर तू खुश होतीस. माझा दृष्टीकोन तूं तेव्हा विचारला असतास तर मीं तुला जरुर सांगितला असता. ”

“ आपण दोघं एक आहोंत, आपण दोघं पति पत्नी आहोंत अशा भावनेनं वागला नाहीं तुम्ही कधीं ? ”

“ मुळींच नाहीं. उलट याला विरोध करणाऱ्या गोष्टीहि मीं केल्या आहेत. मी चुकूनसुध्दां तुझ्याजवळ प्रेमाची, लग्नाची, किंवा आपण दोघे एक असल्याची गोष्ट बोललो नाहीं. ”

“ बोलला नाहींत, पण वागणुकीनं फसवलंत मला. ”

" मीं नाहीं फसवल. तूं फसलीस त्याला मी काय करूं ? "

" मग स्त्री पुरुषांच्या या निकट संबंधाला तुम्ही पतिपत्नीचं नातं नाहीं समजत ? माझ्याशीं तुम्ही इतकी लगट केली....... "

तिचा आवाज चढला होता. मी म्हणालों " हळूं बोल. लोक ऐकतील. पण लगट तूं केलीस माझ्याशीं. मी नुसतं उत्तेजन दिलं तुला. कधीं कधीं तें सुद्धां दिलं नाहीं. तूं मला आवडत होतीस. "

" मी आवडत होते ना तुम्हाला ? मग लग्न कां नाहीं करायचं प्रभाकर ? "

" आवडत होतीस. पण म्हणून काय झालं ? स्त्रीकडे मी केवळ स्त्री म्हणून पहातों. स्त्रीला पुरुष आणि पुरुषाला स्त्रीचं आकर्षण असतं या पलिकडे त्याला कांहीं अर्थ नाहीं. माझा दृष्टीकोन हा असा आहे. "

" मग माझ्याशीं लग्न करणार नाहीं तुम्ही प्रभाकर ? "

' इतकं मी सांगितल्यावरहि माझ्याशीं लग्न करण्याची इच्छा आहे तुला ? '

" हो. "

" आश्चर्य आहे ! "

" आश्चर्य नाहीं. ज्याच्या बरोबर मी अनेकदा हिंडलें, ज्याचा हात मीं एकदा हातात धरला, पती या नात्यानं मीं ज्याच्या खांद्यावर हजारों वेळां विश्वासान मान टाकली, त्या पुरुषाशिवाय दुसऱ्या पुरुषाचा स्पर्श मला कल्पनेंत देखील दुःसह वाटतो. "

पुन्हां मला सुमनची आठवण झाली. मनांत हसलों मी. उघड कांहींच बोललों नाहीं. ती मात्र बोलतच होती. सुमनसारखीच सुमित्रा या प्रेमाच्या वावटळीच्या भोवऱ्यात सापडली होती. तें वारं कानात शिरलेल्या मुली मग असंच बोलतात. आपल्या भावना आणि विचार हे दगडाप्रमाणें स्थिर आहेत असंच त्या समजत असतात. पण मला माहीत होत. आणखी कांहीं दिवसानीं सुमित्रा, माझ्यावर केलेलं हेंच प्रेम दुसऱ्या एखाद्या पुरुषावर करूं लागेल. अगदीं पहिल्या इतक्याच उत्कटतेनं. असंच असतं ना हें प्रेम ? जें एकदा एकावर केलं तें दुसऱ्यावरसुद्धां करतां येतं ना ? म्हणजे

इतकी कांहीं महाग वस्तु नाहीं ही. मग मी तरी हिच्या आग्रहाला, प्रेमाच्या क्षणिक लहरीला कां बळी पडूं ?

सुमित्रा म्हणाली " आतां मी आईला काय सांगूं ? बाबांना काय सांगूं ? माझा भाऊ मला काय म्हणेल ? या साऱ्यांना मी आतां कसं तोंड दाखवूं ? तुमचा मला केवढा विश्वास वाटत होता ! माझा विश्वास-घात केलात तुम्ही. माझी थट्टा केलीत इतके दिवस. माणसान वाटलं तर पाहिल्यापासून फटकून वागाव पण जवळ येऊन अशी निर्दय थट्टा करू नये. आई ग. " असं म्हणून सुमित्रा रडूं लागली. मी कांहींच बोललों नाहीं. स्त्रीच्या अश्रूंत आपलं मन विरघळूं द्यायचं नाहीं हा मंत्र मी जपत होतों.

मीं घड्याळांत पाहिल आणि म्हणालों " आठ वाजायला आले. घरीं नाहीं का जायच ? "

चटकन तिन डोळे पुसले. पदर सावरला. आणि उठून उभी राहिली. मीहि उभा राहिलों तिच्याबरोबर चालायला लागलों. पण ती म्हणाली " तुम्ही येऊ नका माझ्याबरोबर. "

" घरापर्यंत पोंचवून देतों तुला. "

" आयुष्यांत जिला एकटीनं भटकावं लागणार आहे, तिला घरा-पर्यंतची तरी सोबत कशाला हवी ? मी जातें. एकटीच जातें. तुम्ही येऊं नका माझ्याबरोबर. तुमची माझी हीच अखेरची भेट. प्रत्यक्ष मी समोर असतांना ज्याला माझा विसर पडला, त्याला ' विसरूं नका, आठवण ठेवा ' अस तरी काय सांगायच ? मी मात्र विसरणार नाहीं तुम्हाला प्रभाकर. "

असं म्हणून ती चालूं लागली. मी नुसता उभा राहून पहात होतों. मगाशीं ती माझ्या पायांनीं जिना उतरली होती. आतां तिचे पाय अगदीं पांगळ्यासारखे जड झाले होते. मघाशीं मी तिच्याबरोबर होतों. आतां ती एकटीच चालली होती. थोड्या वेळांपूर्वीं ती सौख्याच्या शिखरावर होती. भविष्य काळांतलीं स्वप्न ती पहात होती. पण आता दुःखाच्या दरींत कोसळून पडली. स्वप्नांचीं फुलं...त्यांचा आतां निर्माल्य झाला. भविष्य-

काळाच्या अंधाराच्या राशी तिच्या डोळ्यापुढें धांऊन आल्या. चेहरा अगदीं उदास झाला होता. तारुण्यानं रसरसलेली तिची देहयष्टी, तिच्यावर जणु रुग्णछाया पसरली. अस आहे हें प्रेम. अशी आहे या प्रेमाची दुनिया, एका क्षणात दुसऱ्याच जगांत नेऊन सोडते. मला सहानुभूति वाटली तिच्याबद्दल. तिची दया आली मला. मनांतल्या मनांत कींव येऊन मी हळहळलो तिच्यासाठीं. पण तिच्या बद्दल प्रेम ? तिच्याशीं लग्न ? अहो, ज्या गोष्टी या जगात अस्तित्वांतच नाहींत त्यांची अनुभूति माणूस फार तर स्वप्नांत घेऊ शकेल प्रत्यक्ष अनुभव कसा येईल त्याला ? आतां मी स्वप्नांतून जागा झालों होतों. मी नुसता हळहळलों. आयुष्यांतल्या आणखी एका प्रवेशावर पडदा पडला आयुष्यात आलेल दुसर पात्र आतां माझ्या जीवनांतल्या रंगभूमीवर पुन्हां येणार नव्हतं. अस मनाशीं म्हणालों, आणि रस्ता चालू लागलों.

मनाला गांभीर्य आलं होतं. मनाशीं मी बोलत होतों. घरांत पाहुणे येतात तसे आयुष्यांतहि येतात. चार दिवस आपलेपणानं रहातात. पण तो अन्नोदकाचा भाग असतो. आपला हिस्सा घेतला कीं रस्ता चालूं लागतो. असं आहे हें आयुष्य !

# ६

प्रभाकरपंतांना वाटलं आपण आजहि त्या प्रसंगांत आहोंत. सुमित्रा अगदीं आत्ताच आपल्या डोळ्यासमोरुन निघून गेली. तिची ती मोहक आकृति आजहि आपल्या डोळ्यासमोर अगदीं स्पष्ट आहे. कोणाहि रसिक पुरुषाला मोह पडावा, आकर्षण वाटावं असंच सुमित्रेचं व्यक्तिमत्व होतं. आपल्याला तिचं आकर्षण वाटलं, मोह वाटला यांत कांहींच नवल नाहीं. पण आपण तिच्या मोहांत सांपडलों मात्र नाहीं, या आपल्या अलिप्तपणाचं त्यांना आजहि कौतुक वाटलं. एकंदरींत आयुष्यांत एक ठोकर खाल्ल्या-बरोबर आपण सावध झालों. नाहीं तर कित्येक लोक असे असतात कीं, अनेकवार ठेंचा खाऊनहि त्यांना पुन्हां पुन्हा धोक्यांत पडण्याची संवय असते. चुकीचा उलगडा होऊनहि माणस पुन्हा त्याच त्या चुका करतात. त्याच चुकीचं प्रायश्चित्त आणखी एकदां प्रत्यक्ष भोगल्याशिवाय त्या माणसांना जाग येत नाहीं. ते जागे थोडाच वेळ असतात. बाकी त्यांचा सारा जन्म झोपेंत जातो. असला गाफीलपणा आपण मात्र केला नाहीं. सुमननं एक धडा शिकवला तेव्हांच आपण साऱ्या स्त्रियांच्याबाबत तो धडा अगदीं तोंडपाठ केला. मनांत अगदीं मुरवून टाकला. आत्मसात केला. भले शाबास! आयुष्याच तत्वज्ञान आपण लगेच ठरवून टाकलं. सगळं कांहीं तात्पुरतं म्हणून पहायचं. मौज म्हणून उप-भोगायचं. गंमत म्हणून सर्व गोष्टींच्याकडे पहायचं. नवे नवे अनुभव घ्यायचे. जगांत एकच गोष्ट खरी आहे. जगात एकाच गोष्टीला खरी किंमत आहे. जगांत एकाच गोष्टीला महत्व आहे. अनुभव! अनुभव घ्यायचे. अनुभव म्हणजे कांहीं येईल तोच अनुभव घ्यायचा असं नाहीं. ज्या ज्या गोष्टींचा अनुभव घ्यावा असं आपल्याला वाटत असेल ती ती गोष्ट आपण घडवून आणायची. आपोआप घडण्यापेक्षां आपण स्वतः त्या त्या गोष्टी घडवून आणणं याला महत्व आहे. यांत आपलं कर्तृत्व आहे. यांत आपलं कौशल्य आहे. निरनिराळे अनुभव यांचा अर्थ आहे निर-

निराळ्या चवी. सुमनचा अनुभव मला आपोआप आला. नाहीं तरी पहिला अनुभव माणसाला नेहमीं आपणहून येत असतो. पण सुमित्राचा अनुभव मात्र कशा पद्धतीनं घ्यायचा हें माझं अगोदर ठरलेलं होतं. तिची सुमनशीं तुलना करून मीं तिचा आस्वाद घेतला. सुवास घेतला. त्या सुवासाचा जेव्हा उग्र दर्प आला. तेव्हां मीं तें फूलच दूर फेकून दिलं. फुलाना काय ? तीं फेकून दिलीं तरी जोपर्यंत तीं टवटवींत आहेत तोपर्यंत तीं कोणीही उचलून घेतो. सुमित्रेचं असंच झालेलं असेल. ती कुठं आहे, काय करते......बाकी ती संसाराशिवाय दुसरं काय करणार ? सुमनसारखीच ती. नाहींतरी सामान्य माणूस संसारच करतो. दुसरं काय त्याला करता येण्यासारखं असतं ? मीतरी काय केलं ? संसारच केला ना ?

पण तरीसुद्धां सुमन आणि सुमित्रा यांच्या आणि माझ्या संसारांत फरक आहे. सुमनचा संसार तिच्या वडिलांनीं तिच्या गळयांत बांधला. तिच्या मनाविरुद्ध, तिच्यावर बळजबरी करून गळयात बांधला. म्हणजे अनुभव संसाराचाच. पण तो तिच्या मर्जीप्रमाणें नाहीं आला. तिच्या किराणा मालाच्या व्यापारी बापानं जो पुडा संसार म्हणून तिच्या हातात बांधून दिला त्यालाच तिला संसार म्हणावं लागलं. संसार तिच्या गळ्यात पडला किंवा संसाराच्या गळयात ती जाऊन पडली. फारशी समाधानानं कांहीं पडली नाहीं. बाकी पडली म्हणून कांहीं विशेष लागलंहि नाहीं तिला. पण एवढं खरं कीं, संसाराचा अनुभव तिच्या मनाप्रमाणें तिला घेता आला नाहीं. संसाराचा अनुभव जसा आला तसा तिला स्वीकारावा लागला.

सुमित्राची गत तरी याहून वेगळी काय आहे ? सुमनचं तिच्या बापावर वैवाहिक सुख अवलंबून राहिलं तर सुमित्रा ज्या वैवाहिक सुखाची अपेक्षा करीत होती तें सुख मीं नाकारताच तिलाहि हव्या असलेल्या संसाराची आशा सोडूनच द्यावी लागली. हवा असलेला संसार तिलाहि मांडता आला नाहीं. सुमनचा अपेक्षाभंग बापाकडून झाला. सुमित्रेचा अपेक्षाभंग तिच्या प्रियकराकडून झाला. म्हणजे एकूण या साऱ्याचा अर्थ कीं सुमनसारखीच सुमित्रासुद्धां नको असलेल्या संसारांत पडलेली असणार. संसाराचे

अनुभव या दोघींनीं घेतले तरी ते जसे आले तसे घेतले हवे होते तसे नाहीं त्यांना घेतां आले भवितव्यतेला त्या शरण गेल्या. भवितव्यता त्यांना घडवतां नाहीं आली.

माझ मात्र तस नाहीं झाल. एकदर जीवनाची रूपरेषा ध्यानांत येतांच मीं मनाशीं खूणगाठ बाधली, आपल्या अनुभवाला, इच्छेला महत्व आहे. सुमन आणि सुमित्ला याच्या सहवासाच सौख्य उपभोगून मीं अस ठरवलं कीं आपण ससाराच सौख्य अगदीं निराळ्या पद्धतीनं उपभोगायच. माझा ससार मीं माझ्या मनासारखा मांडला. ससार माझ्या गळ्यांत नाहीं येऊन पडला. वैवाहिकसौख्याच्या हातातल मी बाहुल झालों नाहीं. स्त्रीसहवास मीं विवाहापूर्वीहि उपभोगला आणि नतर वैवाहिक जीवनांतल स्त्रीसौख्य कसं असत याचाहि अनुभव घेतला. सुमित्राला माझ्या आयुष्यातून घालवून दिल्यावर मी अस ठरवल कीं आतां आपण लग्न करायचं. माझी परीक्षाहि उत्तीर्ण झाली होती. निरनिराळीं कॉंट्रॅक्टस मी घेऊ लागलों होतों. तेव्हां अस वाटल कीं आता संसार मांडावा. ससारात स्थिर व्हाव. एका अगदीं अनोळखी मुलीशीं लग्न केल्यानतर शृंगाराचा कांहीं निराळाच अनुभव येत असणार. आणि त्या ह्या प्रकाराची मला आतां हौस होती. मीं असं ठरवल कीं इतर लोक मुलगी बघायला जातात तसच आपणसुद्धां जायचं. अर्ध्या तासांत मुलगी बघायची आणि ठरवायच कीं ही मुलगी आपल्याला आवडते कीं नाहीं. त्यांत काय अवघड आहे ! किती तरी लोकांच्या आज काल मी तक्रारी ऐकतों कीं जन्मांत कधींहि न पाहिलेल्या मुलीशीं जन्मभर प्रेमान ससार कसा करायचा ? हे लोक अस कां म्हणतात तेंच मला समजत नाहीं. ससार म्हणजे काय ? स्त्रीपुरुषांच्या शारीरिक सौख्याचा तो कायदेशीर हक्क ! तें सौख्य हक्काच असलं कीं संसार झाला. तें सौख्य आहे एकमेकांच्या आकर्षणावर अवलंबून, आणि तें आकर्षण आहे शारीरिक आकर्षणावर अवलंबून. म्हणून मला मुलगी सुंदर हवी होती. तरुण हवी होती. ती किती शिकली होती. तिला मोटार चालवायला येते कीं नाहीं, पोहतां येतं कीं नाहीं हे सारे प्रश्न माझ्या लेखीं अगदीं खुळयासारखे होते. मला फक्त एकाच गोष्टीची इच्छा

होती. ती म्हणजे शारीरिकदृष्ट्या आम्ही एकमेकांना आवडणं जरूर होतं. निर्मलेला जेव्हां मीं प्रथम पाहिली तेव्हाच ती मला आवडली. ऊंच, बांधेसूद, आटोपशीर देहयष्टी, उत्तम गोरेपण, नाकीं डोळीं रेखीव, काळेभोर केस आणि पिंगट डोळे. पाहिल्याबरोबर कोणाहि पुरुषाला आकर्षण वाटेल अशीच ती होती. तिच्या शिक्षणाची, इतर कलांची मीं मुळींच चौकशी केली नाहीं ती सुदर आणि सशक्त होती. माझ्याहून सात वर्षांनी लहान होती. तिच्याकडे मीं पाहिल तेव्हांच मला अस वाटलं कीं ही मुलगी माझ्या जरबेंत राहील. बस्स ! एवढच मला हव होत. मीं लगेच ती मुलगी पसन्त केली.

कोणती मुलगी ? हीच ना ती ? अस आपल्याच मनाशीं म्हणत प्रभाकरपतानीं वळून जवळच आरामखुर्चीवर झोपीं गेलेल्या आपल्या पत्नीकडे पाहिल. त्याना वाटल, लग्न झाल्यापासून या १५ वर्षांत तिच्यांत आतां थोडासा फरक पडला आहे. फार नाहीं. पण तो सडपातळपणा आतां कमी झाला आहे. तारुण्याचा भर कमी होऊन ही चागली बाई दिसू लागली आहे. पण तरी सुद्धां तिची निरोगी प्रकृति आणि सौदर्य यांच आकर्षण माझ्या दृष्टीनं आहेच कीं. विवाहानं शारीरिक सौख्याचा जो एक परवाना आम्हांला मिळवून दिला, त्या परवान्याच्या आधारावर आम्ही हें सौख्य अगदीं निर्भयपणानं, मनमुराद उपभोगलं. मुलं झालीं. पैसा मिळाला. त्यामुळें प्रतिष्ठा मिळाली आणि एकदरींत माझा संसार मला हवा तसाच झाला.

प्रभाकरपतांना एकदम आठवण झाली आपल्या वरातीची. आपण मुंडावळ्या बांधल्या होत्या. सुंदर पोषाख केला होता. निर्मलेलाहि मुंडावळ्या बांधल्या होत्या. खूपसे दागिने तिच्या अगावर होते. आणि ती एक मोतीया रंगाचा बनारशी शालू नेसली होती. हातांत हिरवा चुडा होता. पायांत जोडवी लखलखत होतीं. आपल्या अंगावरच्या उपरण्याची आणि तिच्या शालूच्या पदराची आपल्या बहीणीनं गांठ मारली होती, आणि त्या उपरण्यानं ओढीत आपण तिला घेऊन मोटारींत बसलों. आपल्यापुढें बँड वाजत होता. दारूच्या कामानं मिरवणूकीच्या शोभेंत

भर पडली होती. आणि ऊंची पोशाख केलेली स्त्रीपुरुष मंडळी आमच्या मोटारच्या मागून येत होती. वरात खूप थाटात निघाली होती. मोटार फुलांनी शृंगारली होती. आणि आमच्या मोटारी बरोबर गॅसचे दिवे घेतल्यामुळे प्रकाशाचा नुसता लखलखाट झाला होता.

गाडींत पोरं चिकार भरलीं होतीं. आम्ही बसलों तेंच मुळीं एकमेकांना खेटून. तिच्या अंगाचा स्पर्श होताच मला एकदम सुमित्राची आठवण झाली. आठवण झाली म्हणजे एवढीच कीं निर्मळेच्या जागीं सुमित्रा येऊन बसूं इच्छित होती. माझी बायको म्हणून मिरविण्याचा मान तिला हवा होता. माझी स्वामीनी म्हणून तिला जगण्याची इच्छा होती. माझ्या संपत्तीवर, देहावर, ती अधिकार गाजवूं इच्छित होती. पण तिची इच्छा तशी असली तरी माझी इच्छा कुठे तशी होती ! मला ही एक अनोळखीच मुलगी माझ्या घरात आणायची होती. या अनोळखी मुलीला मी माझी बायको म्हणून अशा थाटामाटात आणि कायदेशीर रीतीन घेऊन चाललों असताना सुमित्रा मला पहात असेल काय ! तिला काय वाटत असेल ! सुमनचं लग्न झालं तेव्हा मला जें वाटलं तेंच तिला वाटत असेल काय ! माझ्या जीवाची जी काहिली झाली तीच तिची झाली असेल ! सुमनचं लग्न झाल्यानंतर किती तरी दिवस सनईचे सूर ऐकले, बँडचा आवाज ऐकला, चौघडयाचा कडकडाट ऐकला कीं माझ्या पोटांतलीं आतडीं तुटूं लागत. ते सूर मला ऐकवत नसत. आनंद होण्याऐवजीं डोळ्यातून दुःखाश्रु ओघळूं लागत. आणि एकटेपणाची जाणीव इतकी असह्य होई कीं तिथून मला पळून जावंसं वाटे. लग्न म्हटलं कीं मला कसतरीच होई. लग्न म्हटलं कीं मला दुःखाचेच प्रसंग आठवत. अंतःकरणात उचबळून येणारी भावना दुःखाचीच असे. आनंदाची भावना कशी असते हें जणुं काहीं दिवस मी विसरून गेलों होतों. तीच गत सुमित्राची झाली असेल ! ती काय करीत असेल यावेळीं ! तिला काय वाटत असेल ! असं वाटून मी क्षणभर अस्वस्थ झालों.

अस्वस्थ झालों खरा. पण दुसऱ्याच क्षणीं मी हसलों. शेजारीं बसलेल्या कमलाच्या फुलासारख्या माझ्या बायकोकडे पाहून हसलों. माझ्या शेजारीं

बसणारी ही तिसरी मुलगी. हिला काय वाटत असेल ? कसला विचार ही करीत असेल ? याच जागेवर बेकायदेशीरपणें बसून गेलेल्या आधींच्या दोन मुलींची हिला कल्पना असेल ? आपणच प्रथम बसलों अशा भ्रमांत असण या मुलीच्या जातीला अगदीं सहज शक्य आहे सुमित्रा नाहीं का शेवटपर्यंत याच भ्रमांत राहिली ? निर्मलासुद्धा अशीच भ्रमात नसेल कशावरून ?

याच्या अगदीं उलट विचारहि लगेच माझ्या मनांत आला. हिच्या शेजारीं बसणारा मीच पहिला पुरुष असेन ? पुरुषाचा पहिला स्पर्श या मुलीला माझाच होणार आहे ? स्त्रीपुरुषांच्या नात्याची जाणीव या मुलीला मीच करून देणार आहे काय ? कीं यापूर्वी कोणी या फुलाचा वास... हो. अगदीं शक्य आहे. सुमनचा हात मीच नाहीं का आधीं धरला ? सुमित्रेलासुद्धा पुरुषस्पर्शाची पहिली जाणीव मींच नाहीं का करून दिली ? सुमन आणि सुमित्रा यांच्या आयुष्यांत जाण्याचा पहिला मान मलाच नाहीं का मिळाला ? मग सुमन आणि सुमित्रा, यांच्याबद्दल त्यांच्या नवऱ्यांच्या मनांत प्रथम कोणत्या कल्पना आल्या असतील ? वरातीच्या वेळीं या असल्या कल्पना येतात माणसाच्या मनांत ? माझ्या शेजारीं बसून निर्मला काय म्हणत असेल ? तिच्या आयुष्यात पुरुषाची चाहूल माझ्याच रुपान आज आतां येत आहे ना ? कीं......

पण का कोण जाणें ! माझी ही कल्पना मला मुळींच आवडली नाहीं. मीं हळूच तिच्याकडे पाहिल. तिलाहि माझ्याकडे पहाण्याची इच्छा होतीच. डोक्यावर येणाऱ्या मुडावळ्या दूर करण्याच तिन निमित्त केल. आणि माझ्याकडे हळूच पाहून घेतल तिच्याकडे पाहून मी गालांतल्या गालांत हसलों. मला वाटत तीसुद्धां हसली. अगदीं एवढंसच हसली. पण चेहरा प्रसन्न होता. वरातीच्या वेळीं कांहीं कांहीं मुली रडून भारी गोंधळ घालतात. डोळे मुटी एवढे सुजवून घेतात. तो प्रकार हिन केला नव्हता. म्हणून कपड्यांच्या, दागिन्यांच्या, फुलांच्या एवढ्या त्या गोंधळांतहि ती मोठी प्रसन्न आणि सुंदर दिसत होती. सुमन आणि सुमित्रेपेक्षां निर्मला अधिक सुंदर दिसत होती. तिचा उजवा हात तिच्या मांडीवर होता आणि माझा

डावा हात माझ्या मांडीवर होता माझा हात हळूंच सरकवून मीं तिच्या हातावर ठेवला, आणि तिची लुसलुशीत सुंदर बोटं मीं दाबलीं. लाजून तिन मान आणखीच खालीं घातली. मी तिच्या कानाशीं तोंड देऊन म्हणालों " अडचण होते का बसायला ? "

पोरांचं केवढं तरी लेंढार विनाकारण आमच्या मोटारींत कोंबलेलं होतं. जरा आम्हांला जागा ठेवली असती तर ? पण आमच्या जुन्या बायकांचा सोस. नवरा नवरीला अडचण करून मुलांचा गळाठा गाडींत कोंबायचा. मीं विचारताच ती म्हणाली " हो. "

मी म्हणालों " मग माझ्या बाजूला सरकून बैस ना. "

ती कांहींच बोलली नाहीं. तिचा हात अजून माझ्याच हातांत होता. पण ती हसली. पुन्हां एकदा तिन माझ्याकडे मुंडावळयाच्या पदरा आडून चोरून पाहिलं. पण सरकली मात्र नाहीं. पण मग मीच तिच्याकडे सरकून बसलो. मग मात्र मी काहीं बोललों नाहीं. वरकरणी वरातीची मौज पहाण्यासाठीं म्हणून समोर पाहूं लागलों. जशी काहीं तिच्या बाजूला सरकून मीं तिला जागा करून दिली होती. पण एवढ्या झगझगीत प्रकाशांत, एवढ्या लोकांच्या समोर, एकमेकांच्या पदराला गाठी मारून, एकमेकांचा हात हातांत धरून आणि एकमेकांना खेटून आम्ही गाडींत बसलों होतों. आतां आम्हाला कोणाची भीति नव्हती. कोणी कांहीं म्हणेल कीं काय, बोलेल कीं काय याची परवा करण्याचं मुळींच कारण नव्हतं. उलट सर्व लोक आमचं कौतुकच करीत होते. याला कारण एकच. असं वागायचा आतां आम्हाला कायदेशीर परवाना मिळाला होता. ती माझी बायको झाली होती. मी तिचा नवरा झालों होतों.

आणि खरंच हें सौख्य कांहीं निराळं होतं. यांत निर्धास्तपणा होता. यांत सारं कांहीं आमच्या हक्काचं होतं. यांत तिसऱ्या माणसाला एक अक्षर देखील बोलतां येण शक्य नव्हतं. आम्ही कितीहि निकट येऊन वागलों तरी कोणालाहि आम्हांला नांवं ठेवण्याचं कारण नव्हतं. उलट आमची निकट येण्याची धडपड ही गोष्ट इतरांच्या कौतुकाचाच विषय झाली होती. त्यांत लाज वाटण्यासारख कांहींच नव्हतं. शरम वाटण्यासारखं

काहीं नव्हतं. कमीपणा येईल असंहि काहीं नव्हतं. उलट हें सारं चांगलंच होतं. हा सारा परिणाम त्या कायदेशीर परिस्थितीचा. परिस्थिती विपरीत असली कीं, एरवीं जो गुण ठरावा तो मग दुर्गुण ठरतो. एरवीं ज्याची वहावा व्हावी त्याची मग हटकून निंदा होते. जी गोष्ट अगदीं निर्भयतेनं व्हावी तिला नेमक भीतीचं बुजगावण घाबरवीत रहात. चांगल्या परिस्थितींत जिला तेज चढावं तीच गोष्ट मग विपरीत परिस्थितींत भयानक होऊन बसते. नाहीं तर सुमन आणि सुमित्रा यांच्या बरोबर ज्या तऱ्हेनं मी वागलों त्याच तऱ्हेन मी निर्मलेशींहि वागू लागलों. पण निर्मलेवर माझा हक्क होता. कायदेशीरपणें ती माझी बायको होती. आणि त्या कायदेशीरपणाच मला सुख होत होतं.

माझ्या हक्काचं माणूस मला मिळालं होतं. निर्मलेनं माझी कधीं उपेक्षा केली नाहीं. तिनं माझी लहर सांभाळली नाहीं असं सहसा कधीं घडलं नाहीं. माझा सर्व संसार तिनं समाधानानं केला. ती घरात आल्यापासून माझे कपडेसुद्धा मला कधीं बघावे लागले नाहींत. मुलाच संगोपन करण्यांत जेवणाखाण्याची माझी मर्जी सभाळण्यात तिनं कधीं कसूर केली नाहीं.

लग्न केल्यामुळें माझा हा तर फायदा झालाच. शिवाय पितृसौख्याचा लाभहि त्यामुळें झाला. मुलांचा आनंद कसा असतो तोहि मीं उपभोगला. निर्मला अगदीं प्रथमच जेव्हां प्रसूत झाली आणि मुलगा झाला तेव्हां मला खरंच फार आनंद झाला. तिच्यापेक्षा सुद्धा मला मुलाची अपूर्वाई जास्त वाटूं लागली. दवाखान्यांत जाण्यापूर्वीं आम्ही दोघांनीं मिळून आमच्या बाळाबद्दल किती तरी मनोराज्यं रचलीं होतीं. ती दवाखान्यांतून घरीं आली तेव्हापासून मी त्याच्याच तैनातींत होतों. दिवसांतून मी किती तरी वेळां त्याला उचलून घेई. त्याचे पापे घेई. त्याचाच विचार करीत राही. लहान मुलीच्या हातांत बाहुली दिली कीं तिला जशी अपूर्वाई वाटते तशी आमच्या छबकड्याला बघून मला वाटे. हा मुलगा बापाचं नांव म्हणून माझं नांव लावणार या कल्पनेचं मला विलक्षण सौख्य होई.

या मुलाच्या भाग्यानं निर्मलेचे आणि माझे संबंध अधिक जवळचे झाले. त्यामुळें सुमन आणि सुमित्रा यांच्याबद्दल जें मला वाटत होतं त्यापेक्षां

निराळीच भावना निर्मलासंबंधीं माझ्या मनांत कधीं कधीं निर्माण होई. हें असं कां होतं हें बरेच दिवस माझ्या लक्षांत येत नव्हतं. तिचं माझ्यावर प्रेम आहे आणि माझं तिच्यावर प्रेम आहे असं मानायला मी कधींच तयार झालों नाहीं. आणि अजूनसुद्धां नाहीं. जे विकार सुमन आणि सुमित्रा यांच्या सहवासांत माझ्या मनांत निर्माण झाले तेच विकार निर्मलेच्याहि सहवासांत निर्माण झाले. मग त्या विकारांना प्रेम कसं म्हणायच? ती तरुण होती मी तरुण होतों. दोघेहि सुदृढ आणि रूपवान. संपत्ती तर मी घरांत आणीतच होतों. मग कमतरता होती कशांत? कशांतच नाहीं. एवढं असल्यावर आम्हां दोघात आकर्षण निर्माण होणार नाहीं ही गोष्ट सुतराम अशक्य होती. माझ्या मनात निर्मलेबद्दल कांहीं निराळी भावना निर्माण झाली त्याच कारण आमची पहिलीं दोन मुलं. पहिला मुलगा झाला. दुसरी मुलगी झाली. दोन्हीचीहि घरात अपूर्वाई होती. हा मुलांचा अनुभव, पितृसौख्याचा अनुभव मला नवा होता. आणि तो फक्त निर्मलेच्या बाबतच आला होता. एवढ्याचमुळें सुमन किंवा सुमित्रा यांच्यापेक्षां एक निराळी भावना निर्मलाबद्दल माझ्या मनांत चमकून जाई- खरं म्हणजे एवढ्या बारीक गोष्टीचा विचार करीत आपण कधींच बसलों नाहीं. या भावनांचा स्पर्श मनाला होत असे एवढ खर. बाकी सारा वेळ तर पैसा मिळवण्यांत गेला. आणि घरीं आल्यावर बायको मुलांच सौख्य उपभोगण्यांत वेळ जाई. माझ्या मनाच्या या बारीक सारीक छटांकडे कधीं आवर्जून पाहिलच नाहीं. त्याचा स्पर्श मनाला अधून मधून होई एवढच. नाहीं तर वेळ होता कोणाला?

पण तिसरा मुलगा झाला तेव्हां आपल्याला कांहीं विशेष वाटलं नाहीं. आणि चौथी मुलगी जन्माला आली तेव्हां तर ती मला उगीचच आल्या- सारखी वाटली. आतां आणखी मुलं मला नको होतीं. तिलाहि नकोच होती. त्यामुळे चौथ्या नंबराच्या मुलीचा जन्म ही बाब मला किंवा निर्मलाला विशेष नव्हती. थोडीशी नाराजीचीच होती. चौथी मुलगी आली तेव्हां असं वाटायला लागलं कीं हें रहाटगाडग आतां असंच चालायचं. आपल्याला हव असो कीं नको असो. दर तीन चार वर्षांनीं

कोणी तरी जन्माला यायचंच. ती दवाखान्यांत जायची. घरीं यायची. बारसं होऊन नांव ठेवायचं, कीं झाली खर्चाला सुरवात. त्यांत आतां विशेषत्व उरलं नव्हतं. मुलं होणं हा विषय आता कौतुकाचा राहिला नव्हता.

आणि एक दिवस आपल्या लक्षात आलं कीं मुलगा प्रथमच जन्माला आला तेव्हां तो पहिला मुलगा या नवलाईमुळें, अपूर्वाईमुळें निर्मलाबद्दल आपल्याला विशेष कांहीं वाटल आतां कुठें तें वाटत आहे? मग ही मुलांची गोष्ट जर सुमित्रा किंवा सुमन यांच्याबाबत शक्य झाली असती तर निर्मलाबद्दल ज्या भावना माझ्या मनांत निर्माण झाल्या त्याच त्यांच्याहि बाबत झाल्या असत्या. मिळून काय? तर काहीं नाहीं. निर्मलाशीं माझं लग्न झाल होत. कायदेशीर पद्धतीन आम्ही एकमेकाचे बांधील होतों. एकमेकांना एकमेकांची गरज होती. एवढा ससार निर्माण झाल्यानतर आतां एकमेकाच एकमेकांवाचून आडून रहाणार होतं म्हणून आम्ही एकमेकांवर आषक होतों. एकमेकांशीं आपलेपणानं वागत होतों. हा प्रभाव होता त्या परिस्थितीचा. गरज! एकमेकांना एकमेकांची गरज या एवढ्या एकाच गोष्टीमुळें स्त्रीपुरुष एकमेकांना धरून रहातात. आपल्या-लाच ते जखडून घेतात. दुसर कांहीं नाहीं. प्रेम म्हणून ज्याला म्हणतात, निःस्वार्थी प्रेम म्हणून ज्याला म्हणतात तें या स्त्री-पुरुष नात्यांत खरं म्हणजे नसतच. ही एक कवीची कल्पना आहे. गरज, आणि उपयुक्तता-वाद यांवर हे स्त्रीपुरुषाच्या लग्नाचे डोलारे उभे आहेत. मुल ही संपत्ती दोघांच्याहि मालकीची असते म्हणून ते एकमेकांना सभाळून रहातात. म्हणून ते एकमेकांशीं मिळत जुळत घेतात. म्हणून तर ते एकमेकांच्या सहवासांत आनद मानतात आणि सर्वांपेक्षां स्त्री आणि पुरुष! हें स्त्रीत्व आणि पुरुषत्वच एकमेकांना एकमेकांकडे कायम ओढीत रहात. ती एक दोघांचीहि अगदीं सामान्य पण आवश्यक गरज आहे. म्हणून लग्न करून माणसं एकत्र रहातात. त्या एका गोष्टीच सौख्य उपभोगायला मिळावं म्हणून लग्नामुळें उत्पन्न होणाऱ्या कटकटीहि संभाळायला माणूस तयार होतो. यापेक्षा याला दुसरा काय अर्थ आहे? उदात्त तत्वाच्या झुली

पांघराव्या तरी त्याचं तें खरं स्वरुप काहीं स्पष्ट झाल्याशिवाय रहात नाहीं. हें जर स्त्रीपुरुष आकर्षण नसतं तर कोणते स्त्रीपुरुष एकमेकांजवळ राहिले असते ? आपलीसुद्धां अगदीं तीच अवस्था आहे हें एक कारण झाल. शिवाय माझ्या मुलांची काळजी घेण्यासाठीं निर्मला मला हवी आहे. आणि आर्थीक सुखसोयीसाठीं मी तिला हवा आहे जें माझ्याजवळ आहे त्याची तिला गरज आहे. आणि जें तिच्याजवळ आहे त्याची मला गरज आहे. माणसाचं जीवन हें अस आहे. त्याच सौख्य दुसऱ्या माणसा-वर अवलंबून आहे. त्याच्याजवळ असलेल्या गुणाच्या जोरावर त्याला जीवनांत समृद्धी निर्माण करतां येत नाहीं. म्हणून आम्ही दोघ एकमेकांशीं सलोख्यानं घेतों. एकप्रकारें ती माझ्यावर अवलंबून आहे आणि मीहि तिच्यावर अवलंबून आहें. हें अवलंबून असल्यामुळेंच तर आम्हीं एक मेकाशीं टिकून आहोंत. माझ्याजवळ पैसा नसता, मी आजारी, रोगी झालों असतों तर निर्मलान हा आपलेपणा, आणि ही निष्ठा दाखवली असती काय ? इतर व्यवहारासारखाच हाहि एक व्यवहार आहे. सौदा आहे. कांहीं तरी दिल्याशिवाय माणसाला मिळत नसतं. आपल्याला जें हवं असतं त्याबद्दल दुसऱ्याला कांहीं तरी देणं जरूर असतं. एक वस्तु द्यायची आणि दुसरी घ्यायची

ही शुद्ध देवाण घेवाण आहे, हा शुद्ध व्यवहार आहे. हा सरळ सरळ, अगदीं उघड उघड सौदा आहे. पण संसारांत चाललेल्या या देवाण-घेवाणचं स्वरूप आपल्या अंगीं इतकं मुरलेलं असतं, कीं आपण सौदा करीत आहोंत, रोजच्यारोज हा व्यवहार करीत आहोंत, याची आपल्याला जाणीवसुद्धां नसते. आमच्यावर या संसारिक व्यवहाराचे संस्कार इतक्या निरनिराळ्या तऱ्हेनं व पद्धतशीरपणान कोरले गेलेले असतात कीं ते मुद्दाम केलेले आहेत याची आपल्याला जाणीवसुद्धां रहात नाहीं. ते मुद्दाम केलेले संस्कारच संवयीमुळें आपल्याला सहज होऊन बसतात. आपल्या आंगवळणी पडतात. आणि ते मुद्दाम केलेले संस्कार हा आपला माणसाच्या स्वभावाचा अगदीं सहजधर्म आहे असं आपल्याला वाटूं लागतं. तेंच खरं आहे असं मनांत ठसूं लागतं. विवाह, प्रेम, निष्ठा, पावित्र्य, स्वार्थत्याग, दोघांनी एक

होणं, पति पत्नी म्हणजे एका रथाचीं दोन चाकं, समरस होणं इत्यादि भाकड गोष्टीच मग आपल्याला खऱ्या वाटू लागतात. आपण सारखा श्वासोच्छ्वास करीत असतों. पण त्याची जाणीव कांहीं आपल्याला पदोंपदीं होत नाहीं. तें जस अगदीं स्वाभाविकपणें, सहजपणे, न कळत घडत रहात, होत रहातं, तीच गोष्ट आमच्या या विवाह सस्कारांची आहे. तें प्रेम आणि तें एक होणं याच भ्रमांत आम्ही कायम रहातों. आणि हा भ्रम मोडायचा कोणीहि प्रयत्न करीत नाहीं. पुन्हां पुन्हां त्याच त्या पॉलीशचा हात मारला जातो. पण लग्न म्हणजे स्त्री पुरुषांच आकर्षण, लग्न म्हणजे स्त्री पुरुषांची शारीरिक गरज भागवणारी एक कायदेशीर संस्था, असं मात्र कोणीहि कोणाला उघड उघड सांगत नाहीं. माणसाच्या जातीची हीच खरी गमत आहे. तो ज्या दिवशीं माणूस म्हणून जगू लागला त्या दिवशीं त्यान खरं बोलायचं सोडून दिल. त्या दिवशींच त्यानं खऱ्याला खोट आणि खोट्याला खरं स्वरूप देण्याचा कारखाना उघडला

प्रभाकरपतानीं आपल्या पत्नीकडे पाहिल. एकदम त्यांना एका प्रसगाची आठवण झाली. प्रसग कांहीं फारसा चागला नव्हता. रात्र झाली होती. दोन्हीं मुलं हतरुणावर झोपलीं होतीं. प्रभाकरपंत आपल्या एका दूरच्या नातलगाला पोचवून आले होते. तो नातलग तरुण होता. आणि तो गेल्यामुळें त्याची तरुण पत्नी त्याच्या मागें विधवा झाली होती. आपला नवरा गेल्यानतर या तरुण मुलीनं सारा जन्म आता कसा काढावा हा विचार प्रभाकरपंतांच्या मनांत घोळत होता. घरीं आल्यावर निर्मलाशीं त्याचं याच विषयावर बोलणं झालं. आणि अखेर प्रभाकरपंतांनीं निर्मलाला विचारलं " या मुलीनं आतां जन्मभर एकटीनंच रहावं काय ! तिनं काय करावं असं तुझं मत आहे ! "

निर्मला म्हणाली " सध्यांतरी तिला कशांतच राम वाटणार नाहीं. कांहीं करूं नये, त्याच्या आठवणी काढीत दुःख करीत रहावं. याच्यांतच तिच्या मनाचं समाधान आहे. पण काळ हा मोठा धन्वंतरी आहे. तिच्या दुःखाची तीव्रता हळूं हळू तोच कमी करील. "

" तें दुःख कमी झाल्यावर तिनं काय करावं अस वाटतंय तुला ! "

" ती तरुण आहे. तिचा सगळा संसार अजून व्हायचा आहे. तिनं एखाद्या माणसाशीं लग्न करून सुखांत आयुष्य घालवावं असच वाटतंय मला. "

निर्मलेच हें उत्तर प्रभाकरपतांना थोडस अपेक्षीतच होतं. तरी पण एक स्त्री दुसऱ्या स्त्रीबद्दल चटकन एवढे उदार मनाचे उद्गार काढू शकते हें पाहून त्यांना तिच कौतुकच वाटल. मग त्यांनी थोडया वेळांनी विचारल: " घटकाभर अस समज कीं तिच्यावर आलेला हा प्रसंग उद्यां तुझ्यावर आला तर तू काय करशील ? "

त्यांच्या तोंडावर हात टेकून ती एकदम कावरी बावरी होऊन म्हणाली, " कांहीं तरीच काय बोलता ! मला नाहीं असल बोलण आवडत. " आणि एकदम तिन प्रभाकरपतांच्या गळ्यात आपले हात घातले. आणि एखाद्या भयभीत हरीणीसारखी ती त्याना बिलगून बसली.

प्रभाकरपतांनीं तिच्या केसावरून हलकेच हात फिरवला. आणि ते म्हणाले " इतकं घाबरायला काय झाल ! मी कांहीं चाललों नाहीं खरोखरीच. आणि तुला सोडून जाण्याची माझी तरी कुठे इच्छा आहे ? पण आपली नुसती कल्पना कर कल्पना केली म्हणून कांहीं लगेच तस होत नाहीं. क्षणभर अस समज कीं मी अचानकच गेलों. तर तू काय करशील ? तूसुद्धां तरुण आहेस. तुझा सुद्धां सगळा संसार अजून व्हायचा आहे. "

" पण मी तरुण असलें आणि माझा सगळा संसार जरी अजून व्हायचा असला तरीसुद्धां तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणाची सावलीसुद्धां मला खपायची नाहीं. ज्या पुरुषाचा हात लग्न करून एकदां हातांत घेतला, पती म्हणून मीं ज्याच्याशीं प्रेमानं पांच सहा वर्षे संसार केला, आणि हजारों वेळां मीं ज्याच्या खांद्यावर विश्वासान मान टाकली, त्या पुरुषा-शिवाय, म्हणजे तुमच्याशिवाय, दुसऱ्या कोणाचा स्पर्श मला स्वप्नांतसुद्धां दु.सह होईल. शिवाय माझ्या मुलांचे तुम्ही वडील आहांत. या मुलाच्या रुपानं तुमची ही प्रतीमा माझ्या मांडीवर सतत खेळत असतांना दुसऱ्या

एखाद्या पुरुषाशीं हें संबंध......शी ! ही गोष्ट माझ्याबाबत अगदीं अशक्य आहे. ”

प्रभाकरपंत उघड कांहींच बोलले नाहींत. तो प्रसंग आठवतांच आतां त्याना वाटल, तिनं असंच बोलाव अशी जरी आपली इच्छा होती, किंवा ती असंच काहीं बोलेल अशी जरी आपली कल्पना होती तरी तिचं तें उत्तर ऐकताच आपल्याला हसू आल. आणि आपल्या मनांतले ते भाव उघड करून तिला सांगितले नाहींत. एवढंच. पण त्याच वेळीं आपल्याला सुमन आणि सुमित्रा यांची आठवण झाली. त्यांनींहि, भाषेचा फरक करून पण हींच उत्तर दिलीं होतीं. सगळ्या स्त्रियांचीं उत्तरं एक. करणी पण एकच. सुमनन नाहीं लग्न केलं ? सुमित्रेन तरी दुसरं काय केलेल आहे ? आणि त्या नवरा मेलेल्या मुलीनं जर पुनर्विवाह करावा तर निर्मलेन का करू नये पण उघड उघड गोष्टी दिसत असतानाहि आपल्या काल्पनिक प्रेमाचा दिमाख मिरवण्याची मुलींना हौसच असते. इतर मुलींच्यापेक्षा आपल प्रेम मात्र काहीं तरी अद्वितीय आहे अशी स्वतःची समजूत करून घ्यायची आणि दुसऱ्याची करून द्यायची. या बाबतींत या मुलींची जात एकदरींत पटाईत असते म्हणायची. ती मुलगी तरुण म्हणून जर तिला नवरा हवा तर मग निर्मलालाच कां नको ? तारुण्याचा प्रभाव जर तिच्यावर गाजवला जाणार आहे, तर मग हिच्यावरच तो कां नाहीं गाजवला जायचा ?

पण कांहीं नाहीं. या साऱ्या बोलायच्या गोष्टी असतात. या साऱ्या जिभेनं सांगायच्या गोष्टी असतात. पण साऱ्यांच्या अंतःकरणांतले विकार मात्र इथून तिथून एकच असतात. आपल लग्न हा एक व्यवहार आहे. एक सौदा आहे. यापेक्षां याला निराळा अर्थ नाहीं. म्हणण्यासारखी गोष्ट एवढीच कीं हा व्यवहार मला चांगला जमला हा सौदा मला चांगला फायदेशीर करतां आला. होय कीं नाहीं निर्मला ?

झोपलेल्या निर्मलेला उद्देशून प्रभाकरपंत म्हणाले आणि त्यांनीं अंगावर चादर ओढून घेतली. आतां पहाटे चारचा सुमार झाला होता. सारी रात्र तर जागरणांत खर्च झाली होती. आणि आयुष्याचा महत्वाचा अंश म्हणून

अेवढा विचार करायचा होता तो करून झाला होता. तो विचार करतां करतांच प्रभाकरपंत एका समाधानकारक तत्वावर येऊन ठेपले होते. आयुष्यांत आपण एकदां चुकलों आणि मग मात्र आपण सगळया गोष्टी अगदीं बरोबर, हिशोबाच्या दोरींत करीत आलों, याचं त्यांना समाधान वाटल. समाधान झालं कीं माणसाच्या वृत्ती शात होतात. त्याला डोळे मिटावेसे वाटतात. त्याला समाधानाची गुगी येते. तीच त्यांना आली. सुरवातीस जी बेचैनी निर्माण झाली होती ती आतां सपली होती. म्हणून प्रभाकरपतानीं एकदां टकटक करणाऱ्या घडयाळाकडे पाहिल, बाहेर उभ्या असलेल्या दिव्यांच्या खांबाकडे पाहिल. अजूनहि ते तसेच एकाकी उभे होते. प्रकाश देत होते. वाटसरूंची वाट उजळ करीत होते. अजूनहि रस्त्यावरून रहदारी अशी सुरू झाली नव्हती. लांबून येणाऱ्या बैलगाडीचा आवाज मात्र प्रभाकरपतांच्या कानावर आला. एक फकीर हातांतला डमरू वाजवीत दोहा म्हणत चालला होता. विरक्तीच गाण गात होता. असा हा किती लांब जाणार होता कोण जाणें ! आणि त्याच तें विरक्तीच गाणं ऐकायला खर म्हणजे या वेळीं कोणीसुद्धां जाग नव्हत. साऱ्यांची साखर झोप चालली होती. ती साखर झोप प्रभाकरपंतांच्या डोळयावरहि झापड आणूं लागली. त्यांनी पांघरूण ओढून घेतलं आणि डोळ्यांच्या पापण्या बंद करून घेतल्या.

— —

# ७

सगळ्या खोलीभर सूर्याचीं कोवळीं किरणं पसरलीं होतीं त्या किरणांमुळें एक प्रकारचा उत्साह भरल्यासारखा वाटत होता. प्रभाकरपंत रात्रींच्या जागरणामुळें अजून तसेच निजून राहिले होते. निर्मलाबाईची आरामखुर्ची मात्र रिकामी दिसत होती त्या आपल्या नित्याच्या उद्योगाला लागल्या होत्या. पलीकडच्या खोलींत मुलाच्या अभ्यासाची गडबड चालू होती. पण सर्वांच्या हालचालींतून प्रभाकरपंत झोपले आहेत, आणि त्यांची झोपमोड होऊ द्यायची नाहीं ही जाणीव स्पष्ट दिसत होती. मध्येंच एक दोन वेळां प्रभाकरपंताना झोप लागली आहे कीं काय हें पहाण्यासाठीं निर्मलाबाई डोकावून गेल्या आठ वाजले तरी ह्यांना अजून जाग कशी नाहीं अस त्यांना वाटत होतं. कारण रात्रीं ज्या ज्या वेळीं त्यांनीं डोळे उघडून पाहिल त्या त्या वेळीं प्रभाकरपंत झोपी गेल्याचंच त्यांना आढळून आलं होत. प्रभाकरपंत आजारी असले तरी नेहमींसारखेंच ते उजाडायच्या वेळीं जागे होत. आज त्यांना उशीर झाला तेव्हां निर्मलाबाईना स्वस्थ रहावेना. त्या त्यांच्या पलगाजवळ आल्या, आणि आपला हात त्यानीं अगदीं अलगदपणें प्रभाकरपंताच्या कपाळावर ठेवला. त्या स्पर्शानं प्रभाकरपंत जागे झाले. त्यांनीं डोळे उघडून पाहिल. निर्मलाबाईचा हात त्यांनीं तसाच कपाळावर दाबून धरला. त्यांच्याकडे पहात निर्मलाबाई हंसतमुखानं म्हणाल्या " झोप झाली नाहीं अजून ? बर वाटतंय ना ? "

प्रभाकरपंतांनीं नुसतीच मान हलवली. आणि त्यांच्याकडे पाहून ते हसले. पुन्हां निर्मलाबाईनीं विचारल " झोप लागली होती ना रात्रीं ? रात्रीं मीं दोन तीन वेळां उठून पाहिलं. पण झोप लागली होती तुम्हाला. होय ना ? "

प्रभाकरपंत म्हणाले " हो. चांगली लागली होती झोप. बरं वाटतंय मला."

" मग तोंड धुणार का ? चहा आणूं करून ? "

प्रभाकरपतांनीं मान हलवली. ते उठून बसले. निर्मलाबाई त्यांच्या हाता-वर पाणी घालूं लागल्या. प्रभाकरपतांनी तोंड धुतलं. आचाऱ्यान टेबलावर चहाचा कप आणून ठेवला. निर्मलाबाईनीं दिलेला टॉवेल घेऊन त्यांनीं तोंड पुसलं. आणि प्रसन्न मुखांनी त्यांनीं चहाचा कप तोंडाला लावला.

कप खालीं ठेवला तोंच दारावरची घंटा वाजली. निर्मलाबाईनींच दार उघडलं. दारांत एक पस्तीस छत्तीस वर्षांची स्त्री उभी होती. तिनं विचारलं " प्रभाकरपंत आहेत ना घरांत ? "

" हो. आहेत. या ना आंत. " निर्मलाबाईनीं तिला आत आणलं. प्रभाकरपंत निजले होते त्या खोलींतच त्या दोघी आल्या. प्रभाकरपंत त्या स्त्रीकडे अनोळखी नजरेनं पहात म्हणाले " बसा ना. कांहीं काम होतं माझ्याकडे ? "

त्यानीं प्रश्न विचारला आणि त्यांना असं वाटूं लागलं कीं हा चेहरा, हा चेहरा आपण कुठें तरी...कुठें तरी.... ..

तेवढयात ती स्त्री म्हणाली " काम नाहीं तसं काहीं. पण तुमची प्रकृति बरी नाहीं, तुम्ही टायफाईडनं आजारी आहात असं समजलं म्हणून चौकशी करायला आलें. आतां बरं वाटतय ना ? "

" हो. बरं वाटतय. पण तुम्ही... म्हणजे तू...सुमित्रा ना तूं ? "

" हो मी सुमित्राच. बरेच दिवसांनी आपली गाठ पडते आहे नाहीं ?" असं म्हणतांना तिनं आंवढा गिळला. प्रभाकरपंतांच्या मनाची थोडी चलबिचल झाली. पण शेजारीं निर्मलाबाई उभ्या होत्या. त्यांच्याकडे पहात ते म्हणाले, " चटकन ओळखता आलं नाहीं मला. पण ही माझी लहानपणची मैत्रीण सुमित्रा. आणि सुमित्रा, ही माझी पत्नी निर्मला. "

त्या दोघींनीं एकमेकींना नमस्कार केला. सुमित्रा निर्मलाबाईंना म्हणाली " बसा ना. "

निर्मलाबाई थोडा वेळ बसल्या आणि " आलेंच हे " असं म्हणून चहाची तयारी करायला आंत उठून गेल्या. प्रभाकरपतांची आणि सुमित्रेची अवस्था मोठी अवघडल्यासारखी झाली होती. निर्मलाबाई होत्या तेव्हांहि त्यांना अवघडल्यासारखं वाटत होतं आणि आतां त्या उठून गेल्या तरीहि त्यांना

चमत्कारिक वाटू लागल. सुमित्रेच्या डोळ्यासमोर तो भूतकाळातला चित्रपट सारा भराभर सरकू लागला. तो शेवटचा प्रसंग आठवला आणि तिचा चेहरा गोरामोरा झाला. चित्त एकदम अस्वस्थ झालं. आज इतक्या वर्षांनीं, ज्यान आपल्याला हाकलून दिल, तो अतीशय आजारी आहे अस समजल्यामुळें आपल्याला रहावेना म्हणून आपण आलों. प्रभाकरपंतांची प्रकृति सुधारत आहे हें पाहून सुमित्रेला बर वाटलं. पण त्याची भेट... त्याच्या सहवासाची इच्छा या मुलीन एका काळीं केली होती. पण आज ज्या विपरीत परिस्थितींत तिची व त्याची भेट झाली त्या परिस्थितीमुळें त्या भेटीचा आनद तिला होईना. कोणत्याहि गोष्टीला फार उशीर झाला कीं त्यातल स्वारस्य नष्ट होत. त्या भेटीन एक प्रकारें तिच्या अतःकरणाला वेदना होऊं लागल्या. ज्याला आपल सर्वस्व तिन मानल होतं तो एक परका पुरुष म्हणून तिच्यासमोर बसला होता. त्याची बायको, तिला कांहींच माहीत नसल्यामुळें तिच्या स्वागताच्या तयारीला आत गेली होती. आणि त्याची मुल तीं तिचीं कोणीच नव्हतीं आणि तरीसुद्धा त्याचीं मात्र होतीं. जें स्थान आपल्याला मिळायचं तें स्थान....एकेकाळीं त्या दोघांचे सबंध इतके निकटचे होते. पण आज, आता या क्षणीं प्रभाकरपत तिला धड जवळचे नव्हते कीं दूरचे नव्हते. तिला एक परकेपणा तरी पतकरला असता किंवा जीवाभावाच नात तरी तिला मानवल असत. पण ज्या दूरपणाच्या दृष्टीन तिला त्याच्याकडे पहावें लागत होत ती तिच्या सहनशक्तीच्या पलीकडली होती. मनाची अस्वस्थता ही जणु अव्यवस्थाच. ती सावरायला म्हणून तिन पदर सावरला. अस्वस्थ हृदयाला स्वस्थता यावी म्हणून त्यावरून हात फिरवला आणि तोंडावर उसनं हास्य आणीत ती त्याच्याकडे पाहूं लागली.

प्रभाकरपंतांना वाटलं जी मुलगी माझ्या आयुष्यांतून कायमची निघून गेली म्हणून मी काल रात्रींच म्हणत होतों ती पुन्हा आज उजाडल नाहीं तोंच हजर झाली. आपल्या मनाची अस्वस्थता झाकायचा प्रयत्न करीत ते म्हणाले " कुठें असतेस तूं हल्लीं ? "

" सोलापूरला असतें मी हल्लीं. "

" अस्सं ! तिथें आहे वाटतं तुझं सासर ? "

" सासर ? " एवढच म्हणून ती हसली आणि विषय बदलून म्हणाली " काय होत होत तुम्हांला? किती दिवसाचा ताप आला ? "

" ताप एकवीस दिवस आला. टेंपरेचर बरंच असे "

" पण आतां बरं आहे ना ? विश्रांती घ्या भरपूर. या आजारांतून उठल्यावर विश्रांतीची फार जरूर असते. नाहीं तर दुखणं उलटतं. "

प्रभाकरपत नुसतं " हूं " म्हणाले. " माझी प्रकृति बरी नाहीं म्हणून कोणी सांगितलं तुला ? "

" कोणी कां सांगे ना. सांगितल कोणी तरी आणि फार विपरीत करून सांगितल. मी अगदीं घाबरून गेलें. काळजी वाटूं लागली तेव्हां म्हटल चौकशी करावी. आपला जुना मित्र आहे. "

" तेवढयासाठीं सोलापूरहून आलीस तू ? "

" हो. "

प्रभाकरपत स्तब्ध राहिले. मग म्हणाले, " सोलापूरला काय करांत असतेस ? "

" नोकरी करतें शाळेंत. "

" तुझे यजमान काय करतात ? "

सुमित्रानं चेहरा चमत्कारिक केला. हा प्रश्न तिला नको होता कीं काय कोण जाणें. क्षणभर ती थांबली. आणि मग म्हणाली, " मीं लग्न केलं नाहीं प्रभाकर. "

प्रभाकरपंतांच्या छातींतून एक बारीकशी कळ निघाली. त्यांच्या अपेक्षेच्या पलीकडली गोष्ट त्यांनीं ऐकली होती. लग्न कोणाशीं केलं असं विचारून मुलं किती आहेत असा पुढचा प्रश्न ते विचारणारच होते. तिच्या वैवाहिक जीवनाची हकीकत ऐकून आपल्या सुखी संसाराची कहाणी ते तिला ऐकवणार होते. पण ती तर म्हणाली, ' मी लग्न केलं नाहीं प्रभाकर. ' त्यांनीं तिच्या गळ्याकडे पाहिलें, तिच्या गळ्यांत मंगळसूत्र नव्हतं. आणि त्यांच्या ध्यानांत आलं, सुमित्रा अगदीं बारीक झाली आहे. तेच नाक डोळे. तोच सावळा रंग. पण त्यावर एक प्रकारचा फिकुटले-

पणा आला आहे. त्या फिकुटलेपणांत एक प्रकारची विरक्ती मिसळली आहे. पूर्वीच्या सुमित्रेंत आणि आजच्या सुमित्रेंत जमीन अस्मानाचा फरक झाला आहे. तिच्याकडे पाहून त्यांच्या मनाला चरका बसला. पण त्यांनी विचारलं, " लग्न कां नाहीं केलंस सुमित्रा ? "

उत्तर काय द्याव, द्याव कीं देऊच नये अशा गोंधळांत सुमित्रेच मन हेलकावत होत. पण मनाचा हिय्या करून ती म्हणाली, "हाच फरक आहे तुमच्या माझ्यांत. त्या फरकामुळेंच तुम्ही अत्यवस्थ आहांत असं कळल म्हणून मी तुम्हाला बघायला आलें. मीं लग्न कां केल नाहीं हा प्रश्न निदान तुम्ही तरी मला विचारायला नको होता. झालेल तुम्हांला विसरतां येत. मला नाहीं येत अस विसरायला. तात्पुरतं आणि मौज म्हणून बघतां येत नाहीं मला आयुष्याकडे. लग्नासारख्या पवित्र गोष्टीचा मला बाजार करतां येत नाहीं. मौज, गमत यापेक्षां एकनिष्ठ प्रेमाला, पावित्र्याला, जीवननिष्ठेला माझ्या दृष्टीन अधिक महत्व आहे म्हणून मीं लग्न केल नाहीं प्रभाकर. आयुष्यात एकाच नात्यान दोन पुरुषांशीं वागण्याच दुर्दैव मला सहन होण्यासारखं नव्हतं. माझ्या निष्ठेसाठीं, मी तात्पुरत्या सौख्या-पेक्षां चिरतनच्या दुःखाला कवटाळून राहिलें. म्हणून मीं लग्न केलं नाहीं "

प्रभाकरपंत तिचं बोलणें ऐकतांऐकतांच चपराक बसल्यासारखे स्तब्ध होऊन राहिले. काय बोलाव हें त्यांना कळेचना. तिच्याबद्दल पूर्वी कधींही उत्पन्न न झालेला कळवळा त्यांच्या अंतःकरणात उत्पन्न झाला. पण चोरट्यासारखं वाटू लागलं. बोलायची त्यांना एकाएकी लाज वाटू लागली. पण नुसतं बसून रहाण चांगलं दिसलं नसतं. आपली पत्नी चहा फराळाचं घेऊन येण्याच्या आंत सुमित्रेशीं आपल्याला बोलून घेतलं पाहिजे याची त्यांना जाणीव होती. ते सुमित्रेला म्हणाले, " किती वाळून गेलीस तूं. बरं नाहीं वाटत तुला ? आजारी आहेस का तूं सुमित्रा ? "

प्रभाकरपंतांच्या स्वरांतून नकळत स्नेहाचा भाव उमटला होता. तेवढा तो स्पर्श ठणकून ठणकून दुखऱ्या झालेल्या तिच्या मनाला पुरेसा होता. पण त्या स्पर्शानं तिला वेदनाच झाल्या. प्रभाकरपंतांची सहानुभूति आज

तिला वेदना देण्यालाच कारणीभूत होत होती. ती वरकरणी हसून म्हणाली, "छे! मला काय झालं आहे? चांगली आहे माझी प्रकृति."

"गाणं कुठपर्यंत आलं आहे तुझं?"

"वा! बऱ्याच आठवणी आहेत म्हणायच्या तुम्हाला. गाणं जिथें होत तिथेंच मीं सोडून दिलं. आतां आपली येता जातां गुणगुणते तेवढीच."

"गाणं सोडलंस तूं?"

"हो."

"का?"

"गावसं वाटेना म्हणून. गोडी वाटेना त्यात म्हणून सोडून दिलं."

सुमित्रा आपल्या पायाकडे पहात बोलत होती. तेवढ्यात चहाचा ट्रे घेऊन ब्राह्मण बाहेर आला. त्याच्या मागोमाग निर्मलाबाईहि फराळाचं ताट घेऊन आल्या. चहाचा कप सुमित्रेच्या हातात देत त्या म्हणाल्या, "घ्या ना." मग त्यांनीं प्रभाकरपंताना विचारलं, "तुम्ही घेणार थोडा?"

प्रभाकरपंत "नको" म्हणाले. सुमित्रेनं नाइलाजानं कप तोंडाला लावला. बिस्कीटाची बशी पुढें करीत निर्मलाबाई सुमित्रेला पुन्हा म्हणाल्या, "घ्या ना."

"नको. खरंच नको. भूक नाहीं मला."

प्रभाकरपंत म्हणाले "चिवडा घे थोडासा."

"नको. चिवडासुद्धां नको. चहा घेतें आहे ना, मी?" हें बोलताना तिची अवस्था फार चमत्कारिक झाली होती. बोलू नयेसं वाटत होतं. पण बोलणं जरुर होतं. सुमित्रेनं निर्मलाबाईना विचारलं "किती मुलं आहेत?"

"चार. दोन मुलगे आणि दोन मुली."

"सर्वांत लहान कोण? मुलगी का?"

"हो. ही पहा आमची बेबी." असं म्हणून प्रभाकरपंतांच्याकडे पहात पहात त्यांनीं आपलीं मुलं दाखवलीं. सुमित्रा त्यांच्याकडे वरकरणी पाहून हसली. म्हणाली "छान आहेत तुमचीं मुलं शाळेंत जात असतील ना?" मनांत मात्र तिला वाटत होतं, ही जागा आपली होती. आपण

इथल्या मालक होणार होतों. पण या घरीं आपण पाहुण्या म्हणून आलों. मन अगदीं विषादानं भरून गेल.

प्रभाकरपत गप्पच बसून होते सुमित्रेन लग्नच केल नाहीं हें ऐकल्यापासून ते अस्वस्थ होऊन गेले. एकाएकीं त्यांना अपराध्यासारखं वाटू लागल. स्वतःच्या ससाराची आपुलकी एकाएकीं मावळल्यासारखी वाटू लागली. कांहीं तरी बोलायच म्हणून त्यांनीं तिच्या आई वडिलांची चौकशी केली. सार तर पुण्यालाच रहात होते. सुमित्रा एकटीच सोलापूरला रहात होती. निर्मलाबाईनीं तिला आपल्या नव्या बगल्याची माहिती सांगितली आणि अखेर सुमित्रा जायला उठली. जाता जातां ती प्रभाकरपतांना म्हणाली, " विश्रांती घ्या भरपूर. लगेच कामाला लागू नका." मग निर्मलाबाईकडे वळून म्हणाली " त्याना सभाळा तुम्ही. हालचाल करू देऊ नका. बाकी मी हें तुम्हाला कशाला सागायला हव म्हणा ? तुम्ही घ्यालच ती काळजी—"

प्रभाकरपत म्हणाले " किती दिवस मुक्काम आहे तुझा इथें ! कोणाकडे उतरली आहेस ? "

" वडिलाकडेच उतरलें आहें. आणखी एक महिनाभर राहीन बहुधा. "

"मग ये ना एखाद्या वेळीं पुन्हां. "

" नक्की नाहीं वेळ झाला तर येईन. "

" पत्ता काय तुझा ? "

सुमित्रेन पत्ता लिहून दिला आणि हळू हळू ती निघून गेली.

ती गेली आणि प्रभाकरपत बिछान्यावर पडले. त्यांनीं डोळे मिटून घेतले. सुमित्रेन लग्न केल नाहीं अजून ! माझ्यासाठीं ती अविवाहित राहिली ! माझा हात एकदां हातांत धरला होता म्हणून का तिन दुसऱ्याच्या हाताला स्पर्श केला नाहीं ? पधरा वर्षांपूर्वी माझ्या खांद्यावर मान टाकून तिन विसावा घेतला तो इतकीं वर्षं तिला पुरला ? त्या एका आठवणीवर तिन इतकीं वर्षं काढलीं ? तिन उत्पन्न केलेला नात्याचा तो ततू मीं बेदरकारपणान एखाद्या कुजक्या धाग्यासारखा तोडून टाकला. माझ्या आयुष्यांतून मीं तिला हाकलून दिलीं. पण मला वाटत मीं तोडला तो ततू तिनं उत्पन्न केलेला नव्हता. माझ्या मनान तिच्या सहवासाचं सौख्य उपभोगण्यासाठीं

जो तात्पुरता धागा मीं तिच्याशीं जोडला होता तो मीं तोडला. माझाच धागा मीं तोडला. तिचा धागा मात्र अखंड आणि अभंग होता. पण तिनं उत्पन्न केलेला तो तंतू इतका नाजुक आणि चिवट होता काय कीं, तो अजूनहि, १५ वर्षे लोटलीं तरी तसाच टिकून राहिला ? तो तंतू एवढा नाजुक होता काय कीं त्या नात्याचं माणूस माझ्याशिवाय तिच्या समोर उभ रहाण अशक्य होत ? सुमित्रा सुंदर होती. तरुण होती. बुद्धीमान होती. तिच अंतःकरण कलावताच होतं. एवढ असूनहि ती आपल्या प्रेमाखातर अशीच राहिली ! अस असूनहि तिन कडकडीत ब्रह्मचर्यव्रताची खडतर तपस्या केली ? एखाद्या योगीनीप्रमाणें आपलं उभ तारुण्य आणि सौंदर्य तिन व्रतस्थपणानं जाऊ दिलं ? आपल्या शीलाचं पावित्र्य तिनं जसंच्या तस राखल ? तिच्या मनानं एकदा केलेला सकल्प तिला एवढ्या मोलाचा वाटला काय कीं माझी त्या संकल्पाला अनुमति न मिळताहि, अखेरीस मीं त्याची थट्टा केली, आणि तरीसुद्धां तिनं तो आपला संकल्प जसाच्या तसा कायम राखला ? सुमित्रा जाताना म्हणाली ' मीं गाण सोडून दिल ! स्वतःच्या मनानं तिला गातां येत होत. आपल्या अतःकरणांतल्या भावना तिला स्वरांतून व्यक्त करतां येत होत्या. दुसऱ्याच्या भावनांना आव्हान करण्याच सामर्थ्य तिच्या आवाजांत होतं. गाण्यांत ती स्वतःला विसरून जात होती. मग ही स्वतःची भान हरपवणारी कला तिनं माझ्यासाठीं सोडून दिली ? माझ्यासाठीं ही मुलगी वेडी झाली काय ? अरेरे ! तिच्या या एकलकोंड्या जीवनाला मी जबाबदार आहे काय ?

प्रभाकरपंतांच्या अंतःकरणाला वेदना होऊं लागल्या. काल ज्या गोष्टीवर ते येऊन ठेपले होते, ती गोष्ट आज पाण्यांत ढेकूळ विरघळावं तशी नाहींशी होऊं लागली. काल जो निष्कर्ष काढला होता तो सुमित्रा येऊन जातांच व्यर्थ ठरायची वेळ आली. सुमन आणि सुमित्रा यांच्या अनुभवावरून आपण चुकलों तर नाहींच पण अगदीं बरोबर वागलो असा जो मतितार्थ प्रभाकरपतांनीं काढला त्यालाच आज धक्का बसला. एकटी सुमित्रा आली, अर्धा तास बसली आणि प्रभाकरपंतांच्या तत्वज्ञानाच्या इमारतीचे एकेक भाग कोसळण्याच्या बेतांत आले. आपण जी गोष्ट मौज

म्हणून, उपभोग्य आहे म्हणून, तात्पुरती, म्हणूनच विकारी आहे असं समजत होतों, तीच गोष्ट या मुलीनं कायमची, नित्याची, निष्ठेची आणि प्रेमाची म्हणूनच आज इतके वर्षे आपल्या उराशीं धरून ठेवली ? अशी ही खडतर व्रताची दीक्षा सुमित्रान काय सुखासुखी पतकरली असेल ? या पधरा वर्षांत तिन आपल्या आयुष्यात नुसत डोकावूनसुद्धा कधीं बघितलं नाहीं. आपल्या उंबऱ्यांतसुद्धा कधीं पाऊल टाकल नाहीं. एवढच काय पण दुरून नुसती दृष्टीलासुद्धा कधीं पडली नाहीं. तिनं मी फार आजारी आहें अस समजतांच मुद्दाम सोलापूरहून इथें यावं ? मला भेटण्यासाठीं यावं ? उगीच कोण कोणाला भेटायला जातो काय ? उगीच कोण कोणासाठीं सुखाचा त्याग करून दुःखाच्या राशी कवटाळून बसतो काय ? दुःखाचे चटके सतत पंधरा वर्षं ज्या मुलीन सहन केले तिनं प्रत्यक्ष अग्नी काष्ठंच भक्षण केलीं नाहींत काय ?

पण ही उग्र तपस्या तिनं काय म्हणून केली ? माझ्यासाठीं केली ? मीं तर तिला झिडकारून टाकली. माझं तत्वज्ञान, माझं तात्पुरत तत्वज्ञान तर तिच्या दृष्टीनी खासच तिरस्करणीय होतं. माझ्या सारख्या स्वछंदी माणसावर हिनं काय म्हणून प्रेम करावं ? माझ्यासारख्या बेदरकार माणसाशीं हिनं एवढी निष्ठा ठेवण्याच कारण काय ? तिच्याकडून नुसते सुखोपभोग लाटण्याच्या पशुवृत्तीनं, हो निदान स्वार्थीवृत्तीनं ज्यानीं तिला क्षणभर जवळ केली, लहर आली तेव्हां दूर लोटली, अशा माणसाशीं तिन आपल्या प्रेमाच इमान काय म्हणून राखावं ! एकेकाळीं तरुण असणाऱ्या, सुंदर दिसणाऱ्या, कलावंताचं हृदय बाळगणाऱ्या या पोरीनं माझ्यासाठीं जीव पाखडावा काय ? मी कसाहि वागलों, तिला झिडकारली तरी तिनं आपल्या प्रेमाशीं निष्ठावन्त काय म्हणून रहावं ? माझ्यासारखंच, तारुण्यांतल्या या गोष्टींकडे तिन कधींच मौज म्हणून, तात्पुरतं म्हणून, गंमत म्हणून बघितल नसेल काय ? काय वाटलं असेल तिला ? कसे दिवस काढले असतील तिनं ? सहानुभूतीशिवाय, तरुण पुरुषाच्या सोबतीशिवाय, तारुण्यातील विकारी घोड्याना लगाम घालीत या मुलीनं आपल्या ऐन तारुण्यांतील वर्षे कशाच्या जोरावर एकटेपणानं काढलीं ?

खरंच, एकटीनं, अगदीं कोणाच्याहि सोबतीशिवाय, आधाराशिवाय या मुलीन आपल जीवन कस कठलं असेल ! तिची आणि माझी शेवटची भेट झाली, त्या भेटीची आठवण तर तिच हृदय व्यथीत करायलाच अधिक कारणीभूत होणार होती. रात्रीच्या रात्री तिन रडून काढल्या असतील कोणत्या आठवणीवर ती जगली आणि आज मला भेटायला आली !

प्रभाकरपत फार बेचैन झाले. एकट्या सुमित्रेशीं बोलण्यासाठीं त्यांच्या मनाची अतीशय तळमळ होऊ लागली. पण अजून ते निजूनच होते. त्यांना विश्रांती घेण जरूर होत. ताप नसला तरी डॉक्टरनीं हालचाल न करण्याविषयीं त्याना बजावल होत. त्यामुळें नुसता विचार करण्याशिवाय त्यांना आतां गत्यतर नव्हत. ते रोज सुमित्रेची वाट पहात. आज ना उद्या ती केव्हा तरी भेटायला येईल अशी त्याची कल्पना होती. पण ते नुसती वाट पहात आणि आला दिवस तसाच निघून जाई. अनेक माणस त्यांना भेटायला येत. नको असलेलीं माणसहि भेटायला येत. पण सुमित्रा मात्र आली नाहीं. मनातल्यामनांत ते निराश होत होते. अस्वस्थ होत होते. सुमित्रा अर्धाच तास येऊन गेली. पण प्रत्यक्ष तिच्या सहवासांत असताना तिच्याबद्दल त्यांना जें कधीं वाटल नाहीं तें आता त्याना इतक्या वर्षांनी वाटू लागल. थोडी थोडकी नाही. चागलीं पधरा वर्ष त्याना तिची विस्मृति झाली होती. एक दिवस रात्रीं वेळ जात नाहीं या सबबीवर त्यांना तिची आठवण झाली. विस्मृतीच्या आडगळींत पडलेली एक वस्तु एवढीच त्या दिवसापर्यंत तिची किंमत होती. ती आठवणहि त्यांनीं मनावेगळी केली. तिच्या आयुष्याचा निकालहि त्यानीं आपल्या मर्जीप्रमाणें लाऊन टाकला. पण एक दिवस ती ध्यानीं मनीं नसतांना आली. आणि अर्ध्या तासांत आपल्या चारित्र्यानं तिन त्याना अस्वस्थ करून टाकल. त्या अस्वस्थपणाचा त्यांना त्रास होऊ लागला. हा त्रास आपण सुमनच्या वेळीं, निराळ्या जाणीवेनं भोगला होता याची त्यांना आठवण झाली. त्या वेळीं जी अस्वस्थता त्यांच्या मनांत पिंगा घालीत होती तीच आज इतक्या वर्षांनी पण थोडया फरकानी त्यांच्या मनांत गोंधळ उडवून देऊ लागली.

रोज आपल्या मनाला त्यांनीं शेकडों प्रश्न करावेत आणि त्या प्रश्नांचीं उत्तरं मात्र त्यांना आपल्या मनाप्रमाणें देतां येऊं नयेत अशी त्यांची अवस्था झाली होती. फरक एवढाच होता कीं त्या वेळीं ते संपूर्ण निरपराधी होते. आज त्यांना अपराध्यासारखं वाटत होतं. ते म्हणाले, एक दिवस संध्याकाळीं हीच मुलगी आपल्याजवळ प्रेमाची भीक मागत होती. त्या वेळीं तिला आपण दारुण निराशेंत ढकलून दिली. तिची भवितव्यता काय आहे याची जणूं आपल्याला कल्पना होतीच. कारण सुमननं जें केलं तेंच हीही करणार या विषयीं आपल्याला मुळींसुद्धा शंका नव्हती. म्हणून तर आपण जवळ जवळ निर्विकार मनानं तिच्या मागणीचा इन्कार केला. त्या वेळीं जें भविष्य आपण वर्तवल होत तें ततोतंत प्रत्यक्षांत उतरलं असलं पाहिजे अशी आपण खात्री बाळगली होती. पण ती येऊन गेली आणि आपलं भविष्य साफ चुकल्याचं आपल्याला तिन स्वतःच सांगितल. तेव्हांपासून मन भारी बेचैन झाल आहे. कसे दिवस काढले असतील या मुलीनं ! आपण तिच्या मागणीचा अव्हेर केला त्यावेळीं तिला किती यातना झाल्या असतील !

प्रभाकरपंतांना जेव्हां तिची हकीकत माहीतच नव्हती तेव्हां ते फार सुखी होते. तेवढ्या त्या अज्ञानाच्या जोरावर त्यांनीं आपल्या जीविताचा आढावा आपल्या मनासारखा घेतला होता. आपल्या जीवनाला त्यांनीं तत्वज्ञानाची बैठक निर्माण केली होती. त्याच्या त्या अज्ञानामुळेंच ते सुखी होते. स्वस्थ चित्त होते. शांत होते. पण अज्ञानाच्या एका पापुद्र्याला सुमितेनं येऊन स्पर्श करताच ते बेचैन झाले. खरं म्हणजे प्रभाकरपंतांच्या मनांत ज्यामुळें हळहळ निर्माण झाली होती त्यागोष्टी तर घडून चुकल्या होत्या. त्यासुद्धां अशा मुलीच्या बाबतींत कीं जिला एके काळीं त्यानी स्वतःच झिडकारून टाकली होती. तिच्याशीं आपला लटका, तात्पुरता संबंध निर्विकार मनानं तोडून टाकला होता. अशा मुलीबाबत कांहीं नवीन माहिती समजली म्हणून प्रभाकरपंतांनीं आपला संसार एवढा सुखाचा असतांना बेचैन कां व्हावं !

त्यांचं त्यांनासुद्धां तसं वाटत होतं. पण प्रभाकरपंत माणूस होते. दुष्ट नव्हते. माणूस अतःकरणापासून प्रेम करतो म्हणजे काय करतो याचा अनुभव त्यांनीं सुमनच्याबाबत घेतला होता. सुमनवर त्यांनीं खरंच जिवाभावानं प्रेम प्रेम केलं होत. पण त्या प्रेमाचा शेवट तसा झाला, आणि प्रेमभंगाचं दु.ख काय असत याचाहि त्यांना अनुभव आला. तें कडू जहर पचवायला त्याना किती कष्ट झाले, किती यातना सोसाव्या लागल्या! त्या यातनांची आठवण त्यांना सुमित्रा येऊन गेल्यापासून होऊ लागली. आणि मनांत वारवार येऊ लागल कीं याच यातना सुमित्रेन माझ्याबाबत भोगल्या काय? याच दुःखाचा दाह सुमित्रेन सोसला काय? याच प्रेमभगाच्या दुःखान सुमित्रा होरपळून गेली असेल काय? माझ्या प्रेमनिराशेला कारण सुमन झाली. आणि सुमित्रेच्या प्रेमभगाला कारण मी झालों? सुमित्रेच्या दुःखाच कारण मी आहे? सुमित्रेच्या तारुण्याचा सर्वनाश करणार कारण मी आहे? सुमित्रेला जगांतून उठवायला कारण मी आहे? तिला संसारसुखाला पारखी करणारा गुन्हेगार मी आहे?

प्रभाकरपंतांची स्थिती मोठी केविलवाणी झाली होती. आपल्या पत्नीबद्दलची, मुलांबद्दलची, स्वतःबद्दलचीसुद्धां त्यांची आस्था एकाएकी कमी होऊन गेली. आपल्या संसाराला एक प्रकारचं तेज आहे, अस त्याना वाटत होतं. पण तो ससार त्यांना आतां निस्तेज, निर्जीव, खोटा खोटा वाटूं लागला. कोणाशीं बोलण्याची त्यांना इच्छा होईना. निर्मला आली, मुलं आलीं तर त्यांच्याशीं वरकरणी, तोंड देखल बोलून ते त्यांची बोलवण करीत. त्यांच्या डोक्यांत फक्त सुमित्रेचा विचार होता. तिला पुन्हा भेटण्याची, तिच्याशीं बोलण्याची त्यांची फार इच्छा होती. पुन्हां पुन्हां त्यांना वाटे त्या होरपळलेल्या जीवाचं आपण शांतवन केलं पाहिजे. त्या करपून गेलेल्या जीवनावर आपण सहानुभूतीची फुकर घातली पाहिजे. गेलीं पंधरा वर्षे तिनं जो छळ सोसला, एकप्रकारें जो अज्ञातवास कठला, त्या अज्ञातवासांतल्या तिच्या जीवनाची हकीकत आपल्याला समजली पाहिजे. आपल दुःख आजपर्यंत तिला कोणाजवळ बोलतां आलेलं नाहीं. तें आपल्या शिवाय ती कोणाला सांगणार? त्याला वाचा फुटली, आपण

तें सहानुभूतीन ऐकून घेतल, तर त्या कष्टी जीवाच्या यातना कमी होतील. स्त्रीच पावित्र्य, तिचं एकनिष्ठ प्रेम, तिच्या शीलाचं सर्वश्रेष्ठ मोल या गोष्टी आपण सुमनवरून अखेर कवि कल्पनेंत जमा केल्या होत्या. या गोष्टींना आपण कवडी किंमत देत होतों. पण याच गोष्टीसाठीं सुमित्रेनं ही तपस्या केली. उपभोगापेक्षां कांहीं तरी उदात्त समाधान असत याचीच या मुलीनं जन्मभर जाणीव बाळगली नाहीं काय ? त्या एकनिष्ठेच आंतरिक समाधान मिळविण्यासाठींच तिन हें कायमच दुःख कवटाळून धरल नाहीं काय ? सौख्य, उपभोग, गमत, मौज या सर्व गोष्टींना तुच्छ लेखून जीवननिष्ठेलाच तिन आपल सर्वस्व मानल नाहीं काय ? व्यवहाराच्या बाजारा पलिकडे चारित्र्य म्हणून अशी कांहीं एक पृथ्वीमोलाची गोष्ट आहे कीं जिच्यापुढें पृथ्वीच साम्राज्यसुद्धा अखेर कवडीमोल ठरत हेंच या मुलीनं दाखवून दिल ना ! आपल्याला सुमनन कटु अनुभव आणून दिला तेव्हां आपण आपल्या तत्वाकडून एकदम उलटी उडी घेतली. मानसिक समाधान, पावित्र्याच समाधान, अंतःकरणाची शुचिता, चारित्र्याचं वैभव या साऱ्या गोष्टींकडे आपण पाठ वळवली आणि सुमन गेल्यापासून आपण आजतागायत एकच गोष्ट घोकीत राहिलों. उपभोग घ्यायचा. गमत करायची आणि सार कांहीं तात्पुरत म्हणूनच घेत रहायच. कोणत्याहि गोष्टीचा त्याग करून या जगात माणसाच्या जातीला कांहीं मिळवतां येत ही गोष्ट आपल्या अंतःकरणांतून जणूं साफ साफ नाहींशी झाली बाह्य इंद्रियांना जें सुखकारक तेवढच मोलाच अस आपण समजत राहिलो. आणि आयुष्यभर चरित्र्याला मुकलों. सुमन येण्यापूर्वी हीच निष्ठा आपल्या अंतःकरणांत होती. पण ती आली आणि निघून गेली, तेव्हांपासून निष्ठा हा पदार्थ आपल्याला पारखा झाला जी मुलगी आपल्याला आपलं केवळ जीवितसर्वस्व मानीत होती त्याच मुलीला आपण खेळणं म्हणून दूर फेकून दिली. त्याच निष्ठावान् मुलीला आपण अन्याय केला. तिचं सर्व जीवित खरोखरीच माझ्यावर अवलबून होतं. मी असतों तरच या मुलीच्या जीवनांत आनंदाचा फुलोरा फुलला असता. पण माझ्या त्या तात्पुरत्या तत्त्वज्ञानाचा मला कैफ चढला होता. त्या कैफांत मी या मुलीकडे

खऱ्या डोळ्यानीं पाहिलंच नाहीं आणि अखेर तिला आयुष्यांतून उठवायला कारण झालों. तिचा कांहींच अपराध नसताना या मुलीच्या नशिबीं आपण एकलकोंडें जीवन आणलं. आपल्यावर प्रेमभंगाचं दुःख कोसळलं तेव्हां आपल्या विचारांची दिशा पालटून गेली. सुमनचा आपण हजारों वेळां धिक्कार केला. ती भेटायला आली, आपल्या दुबळया मनाची कहाणी सांगू लागली त्या वेळीं आपण तिला एखाद्या कुत्र्यासारखी हाकलून दिली. पण सुमित्रा ! सुमित्रेचं मन मोठं आहे. जो प्रसग सुमनन माझ्यावर आणला तोच मी तिच्यावर आणला. पण मी जसा सुमनचा धिक्कार केला, तिरस्कार केला तसा सुमित्रेनं केला नाहीं. सुमननं माझा त्याग करतांच मी वाटेल त्या मुलीशीं प्रणयाचे खेळ खेळायला मुळींच हरकत नाहीं या बेजबाबदार विधानावर येऊन थडकलों. पण सुमित्रेनं असल्या शीलभ्रष्ट, चारित्र्यशून्य गोष्टींना आपल्या अंतःकरणात थारा दिला नाहीं. मी समजत होतों स्त्रीपुरुष प्रेम म्हणजे केवळ शारीरिक आकर्षण. नवरा बायकोचं नात म्हणजे केवळ एकमेकाची शारीरिक गरज. आर्थिक सुव्यवस्था. एकानं दुसऱ्याला काहीं दिल्याशिवाय दुसरा त्याला कांहीं देत नसतो. पण सुमित्रेला माझ्याकडून कांहींहि न मिळता तिन माझ्यावर एकनिष्ठ प्रेम केल. तिनं आपल्या अतःकरणांत जी एकदां माझी मूर्ती कोरून ठेवली होती ती कशानंहि भंग पावली नाहीं. मी तिचा अव्हेर केला तरी या निष्ठावान् मुलीनं आपल्या अंतःकरणांतली मूर्ती फेकून दिली नाहीं. तिनं अेकलकोंड जीवन पतकरलं, दु.खाच्या राशी कवटाळल्या, आपल्या तारुण्याची उपासमार तिनं सहन केली पण तिन आपल्या चारित्र्याला कलंक लागू दिला नाहीं. आज एका बरोबर उद्यां एका बरोबर असा नाचरेपणा केला नाहीं, आपलं शील, आपलं चारित्र्य सुमित्रेनं जगांतल्या कोणत्याहि सुखोपभोगापेक्षा सर्वश्रेष्ठ मानलं.

प्रभाकरपंताना वाटलं आपण चुकलों. जें जें उपभोग्य, तें तें आपण उपभोगलं. इंद्रियांची लालसा तृप्त केली. पण आपणच खरे भिकारी आहोंत. सर्व प्रकारचे उपभोग घेऊनहि अखेर आपण करंटे आहोंत. त्यागापेक्षां भोगांत सर्व कांहीं सौख्याचं समाधान आहे असं आपण

समजलों हा आपलाच मूर्खपणा आहे. आयुष्यभर सर्व सौख्याची उपासमार सोसूनहि सुमित्राच अखेर श्रीमंत आहे. त्यागानंच तिनं हें वैभव मिळवलं आहे. तीन मुलींच्या शरीराला स्पर्ष करून मी माझ्या देहाचं पावित्र्य गमावून बसलों. पतिपत्नींच्या नात्याकडे भलत्याच, विषारी नजरेनं पाहून मी माझ्या मनाचहि पावित्र्य गमावून बसलों. पण सुमित्रेनं एक चारित्र्याची बूज राखली, शीलाच महत्व आपल्या जीवनापेक्षांहि श्रेष्ठ मानल आणि तिच्या अंतःकरणाचं समाधान तिला कायमचं मिळालं. आपण चुकलों नाहीं, आपली निष्ठा ढळली नाहीं, आपल्या प्रेमाशीं आपण आपलं इमान सोडलं नाहीं या गोष्टीचं समाधान तिला लाभलं आहे. त्यागानच तिन हें वैभव मिळवलं आणि उपभोगानच आपण या आंतरिक समाधानाला मुकलों. माणसाच्या जातीला चारित्र्य, पावित्र्य, शील ही गोष्ट काहीं झाल तरी अधिक मोलाची आहे. ती ज्यान मिळवली तो या जगात श्रीमंत आहे. ती ज्यान गमावली तो या जगांत कमनशिबीच नव्हे काय ? माणुसकीचे संस्कार मरेपर्यंत त्याच्या कानीं कपाळीं मग ओरडत रहाणार कीं तूं जें करायला नको होतंस तें केलंस.

प्रभाकरपंताना वाटल आपल्या मनांत येणारे हे विचार चारी बाजूनी ओरडून आपल्याला दोषी ठरवीत आहेत. आपण चुकलों. आपली दिशा चुकली. शीलाचे पावित्र्य आपल्याजवळ राहिलं नाहीं. आपल्या आयुष्याची इमारत अखेर खोट्या तत्वज्ञानाच्या आधारावर आपण उभी केली. याचं दुःख तर त्यांना होऊं लागलच. पण आपल्यापेक्षांहि सुमित्रेच्या एकलकोंडया, निराश आणि भकास जीवनाचीं चित्रें त्यांना भेडसावू लागलीं. त्याच्या मनानं तिचा जीवन चित्रपट त्यांच्या डोळ्यासमोर उभा केला. आपल्या आठवणीनं होणारी तिची तळमळ, आपण झिडकारल्यामुळें तिच्या स्वाभीमानी वृत्तीचा झालेला अपमान, रात्र आणि दिवस कोणाच्याहि सोबतीशिवाय तिनं कंठलेलं आयुष्य, एकट्या जीवनामुळें तिच्या जीवाची होणारी तळमळ आणि एकांतांत तिनं ढाळलेले अश्रु...अरे रे ! प्रभाकरपंतांच्या अंतःकरणांत कालवाकालव होऊं लागली. स्वतःपेक्षांहि ते आतां सुमित्रेचा विचार अधिक आपलेपणानं करूं लागले. पंधरा

वर्षांनी सुमित्रा अर्धा तास येऊन गेली आणि तेव्हांपासून प्रभाकरपत तिच्या विषयीं जिव्हाळ्यान विचार करूं लागले. तिच आयुष्य म्हणजे आपलच आहे. अशी मनोवृत्ती होण्याइतका जिव्हाळा त्याच्या मनांत निर्माण झाला. पधरा वर्ष सुमित्रेनं खडतर तपश्चर्या केली आणि अर्ध्या तासांत तिन प्रभाकरपतांच्या अतःकरणांत आपल्यासाठीं जागा निर्माण केली. पधरा वर्षांपूर्वी त्यांच्या निकट सहवासात असूनही जी खळबळ त्यांच्या अतःकरणांत उत्पन्न झाली नाहीं ती खळबळ आज केवळ अर्ध्या तासांत निर्माण झाली. उलट सुलट विचारांच्या लाटानीं प्रभाकरपत अक्षरशः बेचैन होऊन गेले. प्रक्षुब्ध सागराच्या प्रचंड लाटांच तांडवनृत्य आपल्या अतःकरणांत चालू असल्यासारख त्यांना वाटूं लागल. गोष्ट किती जुनी. एका काळीं आपल्याच हातांनीं दूर केलेली. आज पधरा वर्ष जणु ती गाडून गेली होती. पण ती एक दिवस आपणहून आली. न बोलावतां, कल्पना नसताना आली आणि प्रभाकरपताच्या अतःकरणाची जणुं उलटापालट झाली

प्रभाकरपतांची अस्वस्थता दिवसानुदिवस इतकी पराकोटीला चालली होती कीं सुमित्रेला भेटून मनाच समाधान केल्याशिवाय त्याना आतां गत्यतर उरल नाहीं. विचार करण्यांत आतां पाऊण महिना उलटून गेला होता. इतक्या दिवसात सुमित्राहि त्यांना भेटायला आली नाहीं. इतके दिवस जरी त्यांनीं तिची वाट पाहिली होती तरी ती जाताना ज्या पद्धतीनें तिनं येण्याबद्दल त्यांना अश्वासन दिल होत त्यावरून ती आपणहून भेटायला येणार नाहीं याची कल्पना त्यांना तेव्हांच आली होती. पण स्वतःहून तिच्याकडे जाण त्यांना शक्य नव्हत, आणि तिला निरोप पाठवून बोलावण्याच धाडस त्यांना होत नव्हत. शिवाय निर्मलाच्या देखत आपण कसे बोलणार हा प्रश्न होताच. त्यामुळें तिला बोलावण्याचा विचार त्याना सोडून द्यावा लागला.

पण आतां त्यांची प्रकृति बरीच सुधारली होती. घरांतल्या घरांत ते हिंडूं फिरूं लागले होते. गाडी करून एखाद्या वेळीं बाहेर जायला हरकत नव्हती. म्हणून सुमित्राला त्यांनीं पत्र लिहिल,

" सुमित्रा,

तू पुन्हा येशील म्हणून मी तुझी रोज वाट पहात होतों. पण तूं आली नाहींस. जवळ जवळ पाऊण महिन्यापूर्वी तूं येऊन गेलीस आणि तुझ्या एकट्या जीवनाची हकीकत समजल्या पासून मी फार अस्वस्थ झालों आहें. पधरा वर्षापूर्वी मी जी चूक केली त्याचा मला आतां पश्चात्ताप होतो आहे. तुझ शांतवन मी कसं करणार ? तेवढ सामर्थ्य माझ्यांत आतां कुठ राहिल आहे ? पण सुमित्रा, तुझी माफी मागावी म्हणून मला तुझी भेट हवी आहे. माझ्याहि वागण्याला कांहीं एक कारण होत. तें मला तुला सांगायच आहे. परवा सध्याकाळीं पाच वाजता मी तुमच्याकडे येईन. मला फक्त तुझ्याशींच बोलायचं आहे. तुझ्या जीवनाचा विचार मी माझ्याच जीवनाइतक्या आस्थेन करतों आहे यापेक्षां तुझ्याबद्दलची माझी भावना मी निराळ्या शब्दात व्यक्त करू शकत नाहीं. तरी तू माझी वाट पहा. परवां सायकाळीं पाच वाजता मी येईन."

प्रभाकर.

प्रभाकरपतानीं पत्र स्वतःच्या हातान पोस्टात टाकल. इतके दिवस विचार करतां करता अखेर आज आपण कांहीं तरी कृति केली याचं त्याना थोडस बर वाटल. पण त्याच्या मनात उत्पन्न झालेल वादळ इतकं प्रचड होत कीं पत्र टाकल्यामुळें त्यांच्या मनाला स्वस्थता येण शक्य नव्हत. त्यांना अस वाटल कीं आपण आतां जन्मभर असेच कायमचे अस्वस्थ रहाणार. शाती म्हणून आपल्या आयुष्यांत यापुढें येणार नाहीं. पश्चात्तापाच्या इगळ्या आपल्या अतःकरणाला कायमच्या दश करीत रहाणार. आपल मन आपल्यालाच सदोदित खात रहाणार. आपल मन आपल्याला कानीं कपाळीं रात्रदिवस ओरडत रहाणार कीं जें करायला नको होतंस तें तूं केलस. एका मुलीचा तू सत्यानाश केलास. एका मुलीच्या आयुष्याचा तूं खेळखंडोबा केलास. एका निरपराध मुलीच्या जीवनाचा तूं बळी घेतलास. एका सुंदर, सतेज आणि सात्त्विक फुलाचं तूं पाय लाऊन निर्माल्य

केलंस. त्या कळीच्या गळ्याला तूं आपला निर्दय फास आवळलास. जगात तिला मानानं जगू दिलं नाहींस. तिच्या संसाराचं सौख्य तूं उधळून लावलंस. सबंध जन्म, चांडाळा, तूं आपल्या हातान तिच्या कपाळीं अज्ञातवास लिहिलास. तिच्या भवितव्याची अशी आग पेटविण्याची तुला मुखत्यारी कोणी दिली होती ? तुझा अनुभव एक वाईट आला म्हणून काय तूं दुसऱ्या एखाद्या निरपराध मुलीला कायमची शिक्षा करशील ? हा अधिकार तुला कुठून आला ? तू निर्दय आहेस. दुष्ट आहेस. राक्षस आहेस. तिची क्षमा मागितलीस तरी या अपराधाचं परिमार्जन होणार नाहीं. हा सारा प्रकार अगदीं विपरीत घडला. सुमनवर तूं प्रेम केलंस तर तिन दुसऱ्याच एका माणसाच्या गळ्यात माळ घातली. आणि तुझ्यावर सुमित्रेन प्रेम केलं तर तूं तिसऱ्याच एका मुलीचा हात हातात घेतलास. सुमनन काय शहाणपणा केला होता म्हणून तू तिच्या पावलावर पाऊल टाकलस ? आणि सुमनन तरी ही गोष्ट सुखासुखी केली याला पुरावा काय ? तुझ्या या आतताई वागण्याला जशी एक कारणपरंपरा आहे असं तूं म्हणतोस तशी सुमनच्या तरी कशावरून नसेल ? तिन स्वत: येऊन आपला दुबळेपणा तुझ्या जवळ कबूल केला. तुझी क्षमा मागितली. पण तिच्या दृष्टींनं त्यावेळीं तू विचार केलास ? मग तुझी कैफियत ऐकून सुमित्रेनं क्षमा मागावी अशी अपेक्षा तूं काय म्हणून करतोस ?

प्रभाकरपंताना वाटल कीं खरंच, आपण सुमित्रेची क्षमा मागणार; पण ती आपलं ऐकून तरी घेईल काय ? पण मग त्याना आठवण झाली सुमित्राचं मन आपल्यापेक्षा मोठं आहे. सुमित्रेनं आपल्या अपयशाचं रूपान्तर दीर्घद्वेषांत दोऊं दिल नाहीं. तिचं आपल्यावर खरंच प्रेम आहे म्हणून तर ती आपल्याला भेटायला इतक्या वर्षांनी पुन्हां आली. तिनं आपल्या जवळ सहानुभूतीची भीकसुद्धां पुन्हां कधीं मागितली नाहीं. पण अत्यवस्थ आजारी असं समजल्यावर तिला माझी भेट घेतल्याशिवाय राहवलं नाहीं. ती आपल्याला नक्की क्षमा करील. ठरल्यावेळीं आपण तिच्याकडे गेलं पाहिजे.

प्रभाकरपंतांनी तो मधला दिवस असाच बेचैनींत काढला. आणि अखेर ती सुमित्राला भेटायला जाण्याची संध्याकाळ उगवली. त्यांनी कपडे केले. गाडी बोलावली आणि सुमित्रेच्या घरापाशीं येऊन ते थडकले.

जिना चढताना त्यांच्या हृदयाचे ठोके जोरानं पडत होते. पावलं मात्र पायऱ्यावरून हळूंहळूं चढत होतीं. मन जसं कांहीं अंधु झाल होतं. प्रभाकरपंताना आठवण झाली, सुमित्रेला भेटायला आपण जात होतों तेव्हां जिन्याच्या पायऱ्या आपण किती वेगान चढत होतों ! तिला भेटायला मन किती आतूर असे. एकेक पायरी गाळूनसुद्धां आपण जिना चढत होतों. पण आज जिना अगदीं चढवतसुद्धां नाहीं. कशानं कोण जाणें पण छाती धडधडते आहे. सुमित्रेला भेटण्यासाठीं आपण गेला महिनाभर तळमळलों. पण...पण...या क्षणीं ती तळमळ जणु कांहीं भेदरल्यासारखी झाली आहे. अपराधी मनाच्या अंत:करणाला क्षमा मागतानासुद्धां कांहीं चमत्कारिक चित्तवृत्तीचा अनुभव येतो आणि तो अगदीं नकोसा होतो. तस माझ झाल आहे. जिना चढून वर जाऊ कीं नको ?

प्रभाकरपंत किंचित् थबकल्यासारखे झाले. अनिष्ट घडणार असलं म्हणजे मनाला जी एक हुरहूर वाटते, अंत:करणांत जी नकारात्मक आंदोलन चालू असतात, होय आणि नाहीं याच्या सीमा रेषेवर जीवाच्या ज्या येरझारा सुरू होतात आणि मग हवसहि वाटत आणि नकोसहि वाटतं, तसं कांहीं तरी प्रभाकरपताना वाटू लागल. तिला भेटाव अस वाटेना. आणि तिथूनच परताव असहि वाटेना. जिना चढता चढतांच मनाची उतावीळ थकून गेली जिना चढतां चढतांच सुमित्रेला भेटण्याची आतुरता मागें मागें रेंगाळू लागली. आपण आज अपराध्यासारखे तिच्याकडे जे जातों आहोंत त्यापेक्षां आपण निरपराध म्हणून तिच्याकडे जाण्याचं भाग्य आपल्या नशिबीं असतं तर किती बरं झाल असत !

असा विचार त्यांच्या मनांत आला. आणि त्यांना एकदम अशी शंका आली कीं सुमित्रानं आपल्याला सांगितलं खरं कीं आपल्यासाठीं ती अविवाहित राहिली. पण तिच्या अविवाहित स्थितीचं कारण दुसरंच नसेल कशावरून ? नाहींतर पवढा तिचा पाण उतारा आपण केला तरी-

सुद्धां ती तो अपमान गिळून आपल्याला भेटायला आली. मानी स्त्रीला ही गोष्ट शक्य आहे काय ? आपण समजतों आहोंत तिचं आपल्यावर प्रेम आहे. पण खरी गोष्ट कदाचित निराळीच असेल. आपल्या बरोबर ती हिंडत होती ही गोष्ट अनेक लोकांना माहीत झाली होती. आणि यामुळेंच तिला दुसरा कोणी नवराच मिळाला नसेल. आपण उगीच समजत आहोंत कीं सुमित्रा आपल्यासाठीं या खडतर व्रताच आचरण करीत आहे. पण जगांत असं कांहीं कोणी केल आहे काय ? त्या साऱ्या पुराणांतल्या गोष्टी. ती आपल्यासाठीं राहिली नाहीं तर तिच्या परिस्थितीनं तिला रहाणं भाग पडल. परिस्थितीनच तिला या उदात्त पातळीवर यायला भाग पाडलं असल पाहिजे. मग हा कसला तिचा मोठेपणा ? हा तर परिस्थितीन लादलेला संन्यास आहे. हें तर परिस्थितीनं निर्माण केलेल विरक्तीच वैभव आहे. हा तर परिस्थितीमुळें उत्पन्न झालेला चारित्र्याचा दिमाख आहे. हा देखावा आहे तिच्या परिस्थितीचा. तिचा नव्हे. तिच्या चारित्र्याचा नव्हे. खायलाच न मिळाल्यामुळें उपवासाच पुण्य हिच्या पदरीं कशावरून पडल नसेल ?

पण प्रभाकरपंतांच्या मनाचीं आंदोलन मोठीं चमत्कारिक झालीं होतीं. कोणतीहि गोष्ट त्यांना खरी वाटेना, कीं खोटी वाटेना. पण हें क्षण मात्रच. शंका घेण्याची जी त्याना इतकीं वर्षे सवय झाली होती तिचा हा प्रभाव होता. पण पुन्हा त्यांचं मन विषादानं भरून गेलं. आपण कतें सवरतेपणाचं वैभव उपभोगलं. आणि आपल्यासाठीं मात्र सुमित्रेचा जीव झुरत राहिला. आपण घेतलेले उपभोग या प्रेमळ, भाबड्या जीवाला पारखे झाले. मंदीराबाहेर उभ्या असलेल्या महारामांगान दुरून परमेश्वराची पूजा बांधावी आणि तेवढ्यावर संतोष मानावा तशी या सुमित्रेची अवस्था आहे. आपण मात्र...

प्रभाकरपंतांना आपल्या अप्पलपोटेपणाची भयंकर शरम वाटली. दुसऱ्या एखाद्याला सुमित्रेच्या या जीवनक्रमाचा मोठा अभिमान वाटला असता. सहवासाचं सौख्य लाभलं नाहीं तरी अशा एकनिष्ठ दुर्मिळ प्रेमाची प्राप्ती झाली म्हणून त्याला धन्यता वाटली असती. पण केव्हां ? तोहि तिच्याशीं एकनिष्ठ राहिला असता तर ! त्यानेंहि तिच्यासाठीं-

आपल्या प्रेमाशीं इमान राखलं असतं तर ! पण प्रभाकरपंतांच्या आयुष्यांत तीन मुली आल्या. त्यांना या विरहांतील प्रेमाचं सौख्य कसं उपभोगायला मिळाव ! म्हणून सुमित्रेच्या निष्ठेचा त्यांना आनंद होईना. ज्यानं कुणासाठीं त्याग केला असेल त्यालाच आपल्यासाठीं त्याग करणाऱ्या त्या कुणाच्या तरी प्रेमाच सौख्य उपभोगतां येत. त्यालाच त्या दुःखांतहि सुख मानतां येतं.

विचारांच्या उलट सुलट गर्तींत गुरफटत असतानाच ते सुमित्रेच्या दारापाशीं येऊन उभे राहिले. त्यानीं दारावरची बेल वाजवली. दार उघडलं गेल. दारांत सुमित्रेची बहिण उभी होती. प्रभाकरपतांनीं ओठावरून जीभ फिरवीत विचारलं,

" सुमित्रा आहे का घरांत—? "

" नाहीं. ती गांवाला गेली, आजच सकाळीं. "

" गावाला गेली ? " असं म्हणतांना प्रभाकरपताची कंबर जणुं खचल्यासारखीच झाली.

सुमित्रेची बहीण म्हणाली, " आंत या ना. त्यांनीं पत्र दिल आहे तुमच्यासाठीं. " असं म्हणून ती आंत गेली. प्रभाकरपत आत गेलेच नाहींत. तिन आणून दिलेल पत्र घेऊन त्यांनीं तें खिशांत घातल. आणि खिन्न मनान ते घराकडे परतले.

घरीं आले तेव्हा त्याचे पाय अगदीं थकून गेले होते. तें पत्र उघडून वाचण्याचा त्यांना धीर होईना. किती तरी वेळ तें पत्र त्यांच्या हातांत तसंच होतं. सुमित्रेन पत्रांत काय लिहिलं असेल याबद्दलच्या अनेक उलट सुलट विचारांची गर्दी त्यांच्या मनांत निर्माण झाली. पण अपयशाची अंधारी डोळ्यासमोर आली असतानाही आशेचा किरण शोधीत रहावं त्या प्रमाणें प्रभाकरपंत आपल्या मनाशीं आपल्याला समाधानकारक तर्क लढवीत राहिले. आणि अखेर त्यांनीं तें पत्र उघडल. सुमित्रेनं लिहिलं होतं,

प्रभाकर,

तुमचं पत्र मिळालं. पण तुमच्या पत्राप्रमाणें मी तुम्हांला भेटूं शकत नाहीं याची मला क्षमा करा. या गोष्टीला आतां फार उशीर

झाला. तुमच्या अंतःकरणांत माझ्यासाठीं स्थान निर्माण व्हावं म्हणून मी तुम्हांला भेटायला आलें नव्हतें. ती वेळ केव्हांच निघून गेली. तुम्ही अत्यवस्थ आहांत असं समजलं म्हणून मी तुम्हाला भेटायला आलें. कारण माझी तीच जीवननिष्ठा आहे. पण ज्या वेळीं तुमच्या माझ्या आयुष्याचा मर्म भिन्न झाला त्यावेळींच तुमच्या आणि माझ्या निष्ठेचा मार्गहि भिन्न झाला. तुम्ही लग्न केलं आहांत. चार मुलांचे वडील तुम्ही आहांत. यापुढें माझ्या-बद्दलचा कसलाहि विचार करणं तुमच्या दृष्टीनं पाप आहे. तुमच्या आजाराचं कारण उद्भवलं नसतं तर तुमची खबर मी इतक्या जवळून कधींहि घेतली नसती. तुमच्या सुशील पत्नीशीं प्रेमान आणि निष्ठेन संसार करण हेंच तुमचं अखेरपर्यंतचं कर्तव्य आहे. तुमच्या संसारांत लुडबूड करून एका स्त्रीच्या संसार सौख्याला ओहोटी लावण्याच कर्म माझ्या हातून घडणार नाहीं आणि तुम्हींही तें करूं नये. प्रेमभगाचं दुःख, पतीच्या अवहेलनेचं दुःख निर्मलाबाईच्या नशिबीं कधींहि आणू नका एवढीच माझी तुम्हांला विनति आहे. मी तुमच्या जीवनांतून कधींच हद्पार झालेली स्त्री आहें. माझ्या नशिबीचं दुःख मी भोगीन. पण तुम्ही मात्र माझी यापुढें एका अक्षरानहि चौकशी करू नका. माझ समाधान माझ्या जवळ आहे. माझी निष्ठा मी सोडली नाहीं. माझ पावित्र्य मी रक्षण केलं आहे. यांतच मला आनद आहे. आ.

सुमित्रा.

प्रभाकरपतांनीं त्या पत्राकडे आदरानं पाहिल. तें पत्र त्यांनीं पुन्हां पुन्हां वाचलं आणि त्यांचे डोळे अश्रूंनी भरून आले. त्यांचे ओठ पुटपुटत होते, "चारित्र्य ! प्रीतीची हांक" ती आज त्यांना ऐकू आली. पण किती लांबून. आज त्यांनीं आपल्या अंतःकरणांत स्वतःला विसरून पाहिल. प्रीतीची हांक मारणारी सुमित्रा वाटेवरून फार पुढें गेली होती. रस्ता अगदीं रिकामा होता. प्रभाकरपंत रस्त्याच्या कडेला एकटेच उभे होते. आणि प्रीतीची हांक जणु अंतराळांत घुमत होती.

---

माझे रसिक भाचे—

श्री. शरच्चंद्र रा. फडके

व

सौ. शामला फडके

यांस